# नवभारत

वर्ष ४ थें ] जानेवारी १९५१ [ अंक ४ था



किंमत १ रुपया

अनुक्रमणिका











नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

वर्ष चौथें
अंक ४ था

# नवभारत

जानेवारी
१९५१

## या अंकांतील जाहिराती









# वर्गणीदारांस सूचना

(१) 'नवभारत'चा अंक दरमहा १ तारखेच्या आंत नियमितपणें काळजीपूर्वक पोस्टांत टाकला जातो. वर्गणीदारांस जर आपला अंक ५ तारखेपर्यंत मिळाला नाहीं तर त्यांनीं प्रथम स्थानिक पोस्ट ऑफिसांत चौकशी करून नंतर आमचेकडे लिहावें. अंक शिल्लक असला तरच पाठविला जाईल. अंक न मिळाल्याबद्दल १० तारखेनंतर येणाऱ्या तक्रारींस उत्तर दिलें जाणार नाहीं.

(२) वर्गणीदार कोणत्याहि महिन्यापासून होतां येतें.

(३) पत्रव्यवहार करतांना नेहमीं अनुक्रम-नंबर अवश्य लिहावा. 'नवभारत' कचेरींतून दरमहा जो अंक रवाना होतो त्यावर पत्त्याच्या वरच्या बाजूस डाव्या हाताला अनुक्रम-नंबर लिहिलेला असतो.

(४) पत्ता बदलावयाचा असल्यास त्याबद्दलची सूचना कचेरीस २५ तारखेपूर्वी मिळाली पाहिजे. त्यानंतर सूचना-पत्र आल्यास त्याची अंमलबजावणी त्याच महिन्यांत न होतां पुढील महिन्यापासून केली जाईल.

(५) 'नवभारत' च्या कोणत्याहि एजंटास वर्गणी वसूल करण्याचा अधिकार नाहीं. त्यामुळें कचेरी व वर्गणीदार या दोघांनाहि त्रास होतो व विलंब लागतो. म्हणून वर्गणी नेहमीं कचेरीकडे खालील पत्त्यावर पाठविण्याची कृपा करावी.

व्यवस्थापक
**'नवभारत',**
टिळक रोड, पुणें २

# जाहिरातींचे दर

| | संबंध पान | अर्धे पान | पाव पान |
|---|---|---|---|
| एक वेळ | ७५ | ५० | ३५ |
| तीन वेळा | ७० प्रत्येक खेपेस | ४५ प्रत्येक खेपेस | ३० प्रत्येक खेपेस |
| सहा वेळां | ६५ ,, | ४० ,, | २५ ,, |
| बारा वेळां | ६० ,, | ३५ ,, | २० ,, |

पाव पानापेक्षां कमी जाहिरात स्वीकारली जात नाहीं.

| | | |
|---|---|---|
| कव्हर पान नं. ४ | प्रत्येक वेळेस | ५० रुपये |
| कव्हर पान नं. २ व ३ | ,, ,, | २० रुपये |

(१) सर्व जाहिराती 'जाहिराती व जाहिरातदार' या सदरांत छापल्या जातात.

(२) शक्य असेल त्या वेळेस जाहिरातदारांचा थोडक्यांत परिचय देण्याची पद्धत स्वीकारलेली आहे.

(३) एका पानांत दोन कॉलम्स असतात.

(४) पानाचा आकार ८॥" × ५।"

व्यवस्थापक
**'नवभारत'**
२९१ शनिवार, पुणें २






सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाचें मासिक

वर्ष चौथें
अंक चवथा

# नवभारत

जानेवारी
१९५१

संचालक : श्री. शंकरराव देव

संपादक-मंडळ

आचार्य शं. द. जावडेकर-आचार्य स. ज. भागवत - श्री. हरि कृष्ण मोहनी - प्रा. वि. म. बेडेकर
का. संपादक



वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

हें मासिक र. ग. जोशी यांनीं सुलभ मुद्रणालय, २९१ शनिवार, पुणें २, येथें छापून सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाकरितां तेथेंच प्रसिद्ध केलें.






# ' नवभारत ', जानेवारी १९५१

## लेखक-परिचय

[ या अंकांतील खालील लेखकांशिवाय बाकीच्या लेखकांचे लेख ' नवभारतां 'त या वर्षी यापूर्वी आले असून त्या वेळीं त्यांचा परिचय दिला आहे.—का. सं. ]

**प्रा. नी. वि. सोवनी—** पुणें येथील ' गोखले इन्स्टिट्यूट ऑफ पॉलिटिक्स अॅन्ड इकॉनॉमिक्स ' या संस्थेचे उपप्राचार्य. ' Population Problem in India–A Regional Approach', ' International Position of India's Raw Materials ' इत्यादी पुस्तकांचे लेखक.

**प्रा. वा. वि. मिराशी—** ( नागपूर )—प्राच्यविद्यापंडित, पुराणेतिहास-संशोधक, ' कालिदास ' इ० पुस्तकांचे लेखक.

**श्री. मनोहर देखणे—** ( सोलापूर )—यांच्या लघुकथा मराठी नियतकालिकांतून प्रसिद्ध होत असतात.

**प्रा. दे. ज. हातेकर—** वर्धा येथील ' कॉलेज ऑफ कामर्स'मध्यें प्राध्यापक. यांनीं आपल्या प्राध्यापक व इतर मित्रमंडळींच्या सहकार्यानें ' आर्थिक समता-संघ' या नांवाची संस्था वर्धा येथें सुरू केली असून, त्या संस्थेतर्फे वर्ध्यांतील भंगी, मांगगारुडी या समाजांतील सामाजिक-आर्थिक निरीक्षण चालू आहे.

**श्री. त्र्यं. सी. कारखानीस—** ' महाराष्ट्र नाटकमंडळी ' चे संस्थापक व चालक. ' राजाचें बंड ' ' स्वैरिणी ' या नाटकांचे कर्ते आणि नाट्यव्यासंगी लेखक.

**श्री. ज. वा. जोशी—** ( शिरपूर ) वाङ्मयव्यासंगी, चिंतनप्रेमी अभ्यासक.

**प्रा. प्र. रा. दामले—** पुणें येथील नौरोसजी वाडिआ कॉलेजमध्यें तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक.

**प्रा. त्र्यं. शं. शेजवलकर—** पुणें येथील ' डेक्कन कॉलेज पोस्टग्रॅज्युएट अॅन्ड रिसर्च इन्स्टिट्यूट ' या संस्थेंत ' मराठा इतिहासा' चे प्राध्यापक. ' Panipat 1761 ' या ग्रंथाचे कर्ते.

**शुद्धसारंग—** ' आवाजाची दुनिया ' या पुस्तकाचे कर्ते.

**आचार्य शं. द. जावडेकर—** सुप्रसिद्ध राज्यनीतिशास्त्रज्ञ आणि ग्रंथकार. महाराष्ट्र साहित्यसंमेलनाचे माजी अध्यक्ष. ' नवभारत ' मासिकाचे एक संपादक.

**श्री. प्रेमा कंटक—** ( सासवड )—सुप्रसिद्ध समाजसेविका. ' सत्याग्रही महाराष्ट्र ', ' काम आणि कामिनी ', 'भ्रान्त जीवन ' इत्यादी पुस्तकांच्या लेखिका.

**श्री. ह. कृ. मोहनी—** ( नागपूर )— ' तेजस्वी शिक्षण ', 'आमचा सनातन धर्म ', 'शिक्षण आणि सफाई ' इत्यादी पुस्तकांचे लेखक. ' नवभारत ' मासिकाचे एक संपादक.

अनुक्रमणिका








प्रा. नी. वि. सोवनी

# आग्नेय आशियापुढील प्रश्न

दुसऱ्या महायुद्धांतून निर्माण झालेल्या परिस्थितीमुळें आग्नेय आशियांतील पुष्कळशीं राष्ट्रें राजकीयदृष्ट्या गेल्या ४।५ वर्षांत स्वयंशासित झालीं आहेत. हिंदुस्थान, पाकिस्तान, लंका, ब्रह्मदेश, फिलिपाइन बेटें, व इंडोनेशिया हीं तीं राष्ट्रें होत. इंडोचीनचें भवितव्य अद्यापि ठरावयाचें आहे. चीनमध्यें समाजवादी सत्ता स्थापन झाली आहे व तो देश पाश्चात्य राष्ट्रांच्या पाशांतून मुक्त झाला आहे. तथापि, तो रशियाच्या पाशांत कितपत सांपडला आहे व त्यामुळें त्याच्या स्वयंशासनास कितपत बाध आलेला आहे अगर येणार आहे हें सध्यां तरी सांगणें कठिण आहे. वर उल्लेखिलेलीं राष्ट्रें स्वयंशासित झालीं आहेत, ही जागतिक इतिहासांतील अत्यंत महत्त्वाची घटना आहे. आधुनिक सुधारणेमुळें सर्व ज्ञात जग परस्पराशीं निगडित झाल्यानंतरच्या काळांत प्रथमच जगांतील ३० ते ४० टक्के लोक स्वयंशासित होऊन जागतिक राजकारणाच्या रंगभूमीवर हक्कानें प्रवेश करीत आहेत. या घटनेमुळें कित्येक जागतिक प्रश्नांचें स्वरूप पार बदलून गेलें आहे व जाईल यांत नवल तें काय ?

आग्नेय आशियांतील देशांच्या भवितव्यासंबंधीची चर्चा तीन टप्प्यांनीं करणें आवश्यक आहे. प्रथमतः या देशांतील राजकीय आर्थिक परिस्थिति व त्यांच्या विकासाचे मार्ग व त्यांतील अडथळे यांचा विचार केला पाहिजे. नंतर त्यासंबंधीं तेथील शासन संस्थांचीं संभाव्य धोरणें कोणतीं असतील हें पाहिलें पाहिजे. ही अन्तर्गत परिस्थिति व धोरणें यांसंबंधीं चर्चा झाली. त्यानंतर बदलत्या जागतिक परिस्थितीचा त्यावर कोणता परिणाम होईल व त्यांत काय बदल अगर फरक पडतील ह्याचा अंदाज घेतला पाहिजे. ह्या सर्व प्रश्नांपैकीं प्रत्येक प्रश्न अत्यंत महत्त्वाचा असून तो एक एक स्वतंत्र लेखाचाच विषय होऊं शकेल. परंतु योग्य स्थलावकाशाच्या अभावीं प्रस्तुत लेखांत या प्रश्नांच्या व्याप्तीचें केवळ त्रोटक व सूत्रबद्ध असेंच दिग्दर्शन करावयाचें योजिलें आहे. या दिग्दर्शनानें आग्नेय आशियांतील देशांच्या पुढें असलेल्या प्रश्नांची साकल्यानें साधारण कल्पना येण्यास मदत होईल.

आग्नेय आशियांतील बहुतेक देशांना स्वयंशासनाचे अधिकार मिळाल्यामुळें त्यांचे सर्व प्रश्न सुटलेले नाहींत, हें आपणांस स्वानुभवावरूनच कळून येईल. या देशांपुढील मुख्य प्रश्न सर्वांगीण विकासाचा आहे व आर्थिक आणि राजकीय या त्याच्या दोन अत्यंत महत्त्वाच्या बाजू आहेत. त्यांचा विचार वेगवेगळा करणें सोईचें होईल.

## औद्योगीकरणाची गरज

आग्नेय आशियांमधील देशांतील सांप्रतची आर्थिक परिस्थिति कशा प्रकारची आहे याची चर्चा पूर्वीच्या लेखांतून[१] विस्तारशः केली आहे. त्या परिस्थितीचीं मुख्य अंगें, उपांगें थोडक्यांत पुढील-

१ ‘ आग्नेय आशिया : आर्थिक पारतंत्र्यांतून स्वातंत्र्याकडे ’ या विषयावर प्रस्तुत लेखकाचे ‘ नवभारत ’च्या जानेवारी १९४९, मार्च १९४९, जून १९५० च्या अंकांतून अनुक्रमें तीन लेखांक आले आहेत ते पहावेत.









प्रमाणें सांगतां येतील. हे सर्व देश शेतकीप्रधान असून त्यांची औद्योगिक वाढ झालेली नाहीं. विकाऊ पिकांची निपज व त्याची निर्गत यांवर येथील अर्थव्यवस्था व व्यवहार बऱ्याच मोठ्या प्रमाणावर अवलंबून आहेत. आर्थिक विकास सर्वांगीण न झाल्यामुळें आर्थिक व्यवस्था व व्यवहार डळमळीत आहेत व त्यांतूनच त्यांची आर्थिक अस्थिरता निर्माण झालेली आहे. लोकसंख्या विपुल, किंबहुना फाजील असून ती शीघ्र गतीनें वाढत आहे व शीघ्रतर गतीनें वाढण्याचा संभव आहे. सर्वसामान्य ८० टक्के जनता दारिद्र्यानें पीडलेली आहे. लोकसंख्येच्या मानानें या देशांतील नैसर्गिक संपत्ति अत्यंत अपुरी व तुटपुंजी आहे. औद्योगीकरणासाठीं व शेतीच्या विकासासाठीं फार मोठ्या प्रमाणावर भांडवल गुंतविण्याची आवश्यकता आहे. तेथील जनतेच्या अठराविश्वे दारिद्र्यामुळें प्रतिवर्षीच्या उत्पन्नांतून फारशी बचत होऊं शकत नाहीं व भांडवलाची निर्मितीहि पुरेश्या प्रमाणावर होत नाहीं. येथेंच निर्माण होणाऱ्या भांडवलावर विसंबून राहिल्यास आर्थिक विकास होण्यास फार मोठा कालावधि लागेल व त्या कालावधींत प्रजेची वाढ झाल्यामुळें जीवनमानहि वाढण्याचा फारसा संभव नाहीं. या देशांचें औद्योगीकरण युद्धपूर्वकाळांतील जपानच्या वेगानें झाल्यास किती भांडवल लागेल यांचें गणित प्रा. यूजेन स्टॅले यांनीं ( World Economic Development, 1944 ) केलें आहे.[२]

हा अंदाज युद्धापूर्वीच्या किंमतीवर आधारलेला आहे. अलीकडच्या महागाईच्या काळांत तो दुपटीतिपटींनीं वाढवावा लागेल. शिवाय त्यांत शेतकीसुधारणेसाठीं व दरवर्षीं घसारा वगैरेसाठीं लागणाऱ्या भांडवलाचा समावेश झालेला नाहीं. वरील अंदाजाप्रमाणें लागणाऱ्या भांडवलापैकीं या देशांतूनच किती मिळूं शकेल ? सर्व अडचणींकडे दुर्लक्ष करून व अत्यंत आशादायक अंदाज खरे धरून हिंदुस्थानासंबंधीं गणित केल्यास जवळजवळ २० वर्षांत लागणाऱ्या एकंदर भांडवलापैकीं पाव हिस्सा भांडवल येथें हिंदुस्थानांत उभारतां येईल असें दिसतें. कमी-अधिक प्रमाणांत हाच अंदाज इतर देशांनाहि लागूं होईल. परदेशाहून, म्हणजे मुख्यतः अमेरिकेकडून, बरेंचसें भांडवल या देशांतून गुंतवल गेलें तरच येथें कांहीं वेगानें आर्थिक विकास होण्याची शक्यता आहे. तथापि, परदेशी भांडवलाबरोबर येणारें परदेशी राजकारण येथील जनतेस कितपत मानवण्यासारखें आहे, हें सांगणें कठिण आहे. सर्व राष्ट्रीय संस्थांच्या मार्फत भांडवलाचा पुरवठा झाल्यास हा प्रश्न थोडाफार सौकर्यानें सुटूं शकेल. तथापि, या संस्थांनाहि भांडवलाचा पुरवठा

---

२ जपानच्या वेगानें, औद्योगीकरणास लागणारें भांडवल व त्याच्या गुंतणावळीचा काळ

| देश | लोकसंख्या ( कोटी ) | क्षेत्रफळ ( चौ. किलोमीटर ) | ४० वर्षांत गुंतवावयाचें भांडवल ( १९३६ ची क्रयशक्ति धरून ) ( अब्ज डॉलर्स ) | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | | | १ लें दशक | २ रें दशक | ३ रें दशक | ४ थें दशक |
| चीन | ४५·०९ | ११,१०३ | १३·६ | २३·१ | ४४·९ | ५१·६ |
| ( अविभक्त ) हिंदुस्थान | ३६·५९ | ४,०७९ | ७·२ | १४·६ | २७·७ | ३१·४ |
| इंडोनेशिया | ६·८४ | १,९०४ | २·२ | ३·७ | ७·२ | ८·३ |
| इतर प्रदेश ( आशियांतील ) | ११·६५ | २,८६५ | ३·५ | ६·० | ११·५ | १३·३ |
| सरासरी | १००·१७ | १९,९५१ | २६·५ | ४७·४ | ९१·३ | १०४·६ |
| प्रतिवर्षी | | | २·७ | ४·७ | ९·१ | १०·५ |

मुख्यतः अमेरिकेकडूनच होत असल्यामुळें तो प्रश्न सुटेलच असें नाहीं.

## राजकीय परिस्थिति

आग्नेय आशियामधील देशांतील राजकीय परिस्थितीहि बिकटच आहे. आर्थिक क्षेत्रांत हे देश कमकुवत आहेत त्याहूनहि थोडे जास्तच राजकीयक्षेत्रांत आहेत. वरवर पाहतां बहुतेक सर्व देशांत लोकशाही राज्ययंत्रें आहेत. परंतु खऱ्या अर्थानें त्या देशांतून लोकशाही अस्तित्वांत नाहीं हें कोणाहि निःपक्षपाती निरीक्षकास कबूल करावें लागेल. अशिक्षित व असंघटित समाज, दारिद्र्याचा कडेलोट, सामाजिक व्यवस्थेंत लोकशाहीला पोषक अशा परंपरांचा अभाव, अशीच परिस्थिति सर्वत्र आढळते. जातिसंस्थेमुळें एकजिनसी दिसत असलेला परंतु त्यामुळेंच आंतून पोखरलेला, विघटित व विकलाग असलेला हिंदुसमाज हिंदुस्थानांत आढळतो; तर लंका, इंडोनेशिया ब्रह्मदेश, फिलिपाईन व मलाया या देशांतून निरनिराळ्या परदेशी लोकांच्या आगमनामुळें निर्माण झालेला फुटीर प्रवृत्तीचा बहुसांस्कृतिक समाज दिसून येतो. खऱ्या लोकशाहीच्या प्राणप्रतिष्ठेस हें वातावरण व ही परिस्थिति अत्यंत प्रतिकूल आहे. त्यामुळें या देशांतील सध्यांच्या सत्ताधाऱ्यांचा कांटा सर्वाधिकारशाहीकडे झुकता असल्यास त्यांत आश्चर्य नाहीं. शांतता व सुव्यवस्था टिकवून राजकीय स्थैर्य वाढत्या प्रमाणांत संपादणें आणि त्याबरोबरच खऱ्या लोकशाहीच्या स्थापनेसाठीं प्रयत्न करणें ह्या बऱ्याचशा परस्परविरोधी अशा दोन प्रवृत्तींमधून या देशांतील सांप्रतच्या राज्यकर्त्यांस मार्ग काढावयाचा आहे. हें काम किती दुर्घट आहे याची कल्पना सर्वांस पूर्णपणें अद्याप आली आहे असें वाटत नाहीं. या देशांतील सध्यांचे राज्यकर्ते 'देशभक्त' वर्गापैकीं आहेत. परकीय राज्यसत्तेचें उच्चाटन करणें व त्यासाठीं राष्ट्रांत असंतोष निर्माण करून चळवळी करणें यांतच बहुतेकांचें आयुष्य गेलेलें आहे. राज्यकारभार हांकण्याची त्यांवर जबाबदारी नसल्यामुळें त्यांस त्याचा अनुभव नाहीं. स्वदेशांतील सर्व दोष अगर कमीपणा हें परकीय राज्यामुळें निर्माण झालेले आहेत, अशीच त्यांस शिकवण मिळालेली आहे. त्यामुळें स्वातंत्र्यप्राप्तीनंतरच्या काळांत स्वदेशाची सर्वांगीण उन्नति करण्यासाठीं अत्यंत आवश्यक असलेल्या कठोर आत्मपरीक्षणाचा गुण त्यांच्या अंगीं कधींच बाणलेला नाहीं. स्वातंत्र्यप्राप्तीपूर्वीं परकीय राज्य घालविणें या अकरणात्मक ध्येयामागें का होईना पण या देशांतील जनता एकवटली होती. स्वातंत्र्य आल्यानंतर देशाच्या उन्नतीसाठीं जनतेची एकजूट व सहकार्य मिळवावयाचें असल्यास तिच्यापुढें कांहींतरी करणात्मक ध्येय ठेवणें आवश्यक आहे; सांप्रतच्या राज्यकर्त्यांस या बाबतींत अजून यश आलेलें नाहीं. भविष्यकाळीं तें येईल कीं नाहीं हें सांगणेंहि अवघड आहे. भरींत भर म्हणून कीं काय सध्यांची सार्वराष्ट्रीय राजकारणांतील परिस्थिति फार तंगीची झाली आहे. आंतरराष्ट्रीय राजकारणाशीं या देशाचा पूर्वीपेक्षां फार निकट संबंध येत असल्यामुळें परिस्थिति अधिकच बिकट झालेली आहे.

यानंतर या देशांतील संभाव्य आर्थिक व राजकीय धोरणाचा विचार केला पाहिजे. हीं धोरणें सर्वच देशांत एकाच प्रकारचीं असतील असें अपेक्षिणें अव्यवहार्य होईल. प्रत्येक देशाच्या परिस्थित्यनुरूप तीं ठरतील व त्यांत प्रत्येकाचें वैशिष्ट्य प्रतिबिंबित होईल हें खासच. येथें चर्चा करावयाची ती, या सर्व विशिष्ट धोरणांत जीं सर्वसामान्य सूत्रें दिसतील अशी अपेक्षा करतां येईल, त्यांचीच करावयाची आहे. सर्वसाधारण रीत्या वारा कसा वाहील एवढेंच पाहावयाचें आहे. ती सर्वच चर्चा 'असें असलें तर असें असण्याचा संभव आहे,' अशा जर-तरी वाक्यांनींच करावी लागेल.

## स्वरक्षणाची तरतूद

स्वातंत्र्यप्राप्तीची पहिली प्रतिक्रिया म्हणजे या देशांतील राष्ट्रीयत्वाची भावना अधिक जोरावणें ही होईल. पारतंत्र्यामुळें देशास आलेली अवनत अवस्था नाहींशी करून त्यास जगांत मानाचें स्थान व महत्त्व मिळविण्यासाठीं प्रयत्न करण्यांत येतील. त्यासाठीं या सर्वच देशांत आपापल्या देशांची राजकीय व आर्थिक अस्मिता जोपासण्याचे प्रयत्न होतील. यासाठीं परकीय अंमलामुळें राजकीय व आर्थिक जीवनांत शिरलेले दोष काढून टाकण्यासाठीं प्रयत्न होतील. आर्थिक व्यवहारांत शिरलेला एकांगीपणा व त्यांत अनुस्यूत असलेली आर्थिक अस्थिरता नाहींशी



अनुक्रमणिका






करण्यासाठीं आर्थिक व्यवहारांचें विविधीकरण करण्याची खटपट करण्यांत येईल. शेतीच्या क्षेत्रांतील विकाऊ पिकांचें महत्त्व कमी करून व उद्योगधंद्यांची योजनापूर्वक वाढ करून ही विविधता साधतां येईल. त्यांतून दुसराहि एक महत्त्वाचा हेतु साध्य होईल. तो म्हणजे स्वसंरक्षणाचा. स्वतंत्र राष्ट्रें म्हणून आग्नेय आशियांतील देशांवर आपणांस मिळालेल्या स्वातंत्र्याचें रक्षण करण्याची जबाबदारी ओघानेंच आली आहे. व त्यासाठीं त्यांस किमान स्वसंरक्षणाची तयारी ठेवणें म्हणजेच सामरिक सामार्थ्य वाढविणें आवश्यक झालें आहे. सामरिक सामर्थ्यासंबंधीं 'नवभारता'च्या जानेवारी १९५० च्या लेखांकांत विचार केला तेथें आहे. सामरिक सामर्थ्य मुख्यतः युद्धोपयोगी वस्तूंच्या स्वयंपूर्णत्वांत असतें हें सांगितलें आहेच. त्या दृष्टीनें विचार करतां आग्नेय आशियांतील राष्ट्रें स्वसंरक्षणक्षम बनण्यासाठीं काय उपाय योजतील याचा अंदाज करणें कठिण नाहीं. अन्नधान्याबाबत स्वयंपूर्णता आणण्याचा बहुतेक देश प्रयत्न करतील. हिंदुस्थानांत हा प्रयत्न होत आहे. इंडोनेशिया, लंका, मलाया, चीन या देशांतूनहि तो होईल यांत शंका नाही. त्याचप्रमाणें औद्योगीकरणाची व विशेषतः युद्धसाहित्य निर्माण करण्यासाठीं आवश्यक असणाऱ्या लोखंड व पोलाद, वगैरे तयार करण्याच्या कारखान्यांची वाढ करण्याची सर्वच देशांतून खटपट होईल. त्यासाठीं इतर जीवनावश्यक गोष्टी पैदा करण्याचे कारखाने न निघाले तरी चालेल असें धोरण असण्याचा दाट संभव दिसतो. वर सांगितल्याप्रमाणें आर्थिक व्यवहाराची विविधता साधण्यांतच पुष्कळांशीं स्वसंरक्षणाची तरतूद करण्याचा हेतु साध्य होतो.

### अल्पसंख्य जमातींचे प्रश्न

या देशांची सध्यांची राजकीय परिस्थिति फारशी समाधानकारक नाहीं, ह्याचें विवेचन वर आलेलें आहे. बहुसांस्कृतिक समाजांत लोकशाहीची वाढ व राजकीय कार्यदक्षतेचा अभाव यांची सांगड झालेली आढळते. हिंदुस्थान व चीन सोडले तर आग्नेय आशियांतील इतर देशांत अल्पसंख्याक जमातींचा प्रश्न राजकीय दृष्टया बिकट आहे. लंका व ब्रह्मदेश यांमध्यें असलेले हिंदी लोक व सयाम, मलाया, फिलिपाईन, इंडोचीन यांमधील चिनी लोक यांच्या राजकीय हक्कांचा प्रश्न सोडवावा लागेल. अर्थात् या लोकांनीं समजूतदारपणें कोणत्या-तरी एका देशाचें नागरिकत्व पत्करलें तर हे प्रश्न सहज सुटतील. परंतु तसें घडणें दूरापास्त आहे. या देशांस स्वातंत्र्य मिळाल्यावर तेथील या अल्पसंख्य, परंतु आर्थिक व राजकीय दृष्ट्या बलवान् असलेल्या जमातींना त्यांच्या उच्च स्थानावरून खालीं ओढण्याचा प्रयत्न तेथील स्थानिक लोकांकडून व राजकीय पक्षांकडून होईल. सयाममध्यें १९३२ सालीं क्रान्ति होऊन राष्ट्रीय पक्षांच्या हातीं राज्यसत्ता आल्याबरोबर तेथील व्यापार व इतर व्यवसाय यांमध्यें असलेल्या चिनी लोकांवर कडक निर्बंध घालण्यांत आले. एप्रिल १९३९ मध्यें बँकॉक शहरांतील दुकानांवर चिनी लिपींत पाटी लावण्यास मनाई करण्यांत आली. अशा पाट्यांमुळें तें शहर सयामी दिसत नाहीं, असें त्यास कारण देण्यांत आलें. फिलिपाईनमध्यें सर्व किरकोळीचा व्यापार चिनी लोकांच्या हातीं आहे. फिलिपाईन जपानकडून घेतल्यावर स्थापन झालेल्या फिलिपिनो सरकारनें बऱ्याच चिनी व्यापाऱ्यांना हुसकून लावलें. कोणत्याहि परदेशी माणसास म्हणजेच चिनी माणसास मनिला शहरांत आपलें दुकान चालविण्यास बंदी करण्यांत यावी अशा तऱ्हेचा कायदा करण्याची खटपटहि चालू आहे. लंकेमध्यें असलेल्या हिंदी लोकांनीं सिंहली लोकांशीं नेहमीं फटकून वर्तन ठेवलें. त्यांच्याशीं सांस्कृतिक अगर वैवाहिक संबंध विशेष ठेवले नाहींत. लंकेच्या राजकीय लढ्यांत लंकेच्या हितापेक्षां आपले हक्क व स्थान कशीं सुरक्षित राहतील यांकडे मुस्लिम लीगप्रमाणें सर्वस्वीं लक्ष देऊन सिंहली लोकांची अप्रीति संपादिली व हिंदुस्थान व लंका या दोन्ही देशांचे एकसमयावच्छेदें-करून नागरिक राहण्याची व त्यामुळें प्राप्त होणारे सर्व हक्क भोगण्याची लालसा बाळगली. याचा साहजिक परिणाम म्हणून सिंहली लोकांनीं राजकीय सत्ता हातीं आल्याबरोबर हिंदी लोकांचे तेथील नागरिकत्वाचे हक्क काढून घेण्याचा उठाव केला. व त्याप्रमाणें एक कायदाहि करण्यांत आला आहे. ब्रह्मदेशांतही हिंदी लोकांना तेथील नागरिकत्व



अनुक्रमणिका






मिळविणें फार कठीण करण्यांत आलें आहे. शिवाय जमिनीचें राष्ट्रीयीकरण करण्याच्या कायद्यामुळें तेथील हिंदी सावकार–चेट्टी यांच्या जमिनी जप्त झाल्या आहेत. व त्याबद्दल त्यास सरकारकडून थोडीशी नुकसानभरपाई देण्यांत येणार आहे. या अल्पसंख्य जमातींच्या प्रश्नांमुळें आग्नेय आशियांतील राष्ट्रांच्या परस्परसंबंधांत संशयाचें व अविश्वासाचें वातावरण निर्माण होण्याची पुष्कळच शक्यता आहे. शिवाय हिंदुस्थान व चीन या दोन खंडप्राय देशांबद्दल आग्नेय आशियांतील इतर राष्ट्रांना भीति वाटते. पुढेंमागें हिंदी अगर चिनी साम्राज्यशाहीचें आपल्यावर आक्रमण होण्याची शक्यता आहे अशी त्यांस भीति वाटते. त्यामुळें या दोन राष्ट्रांना वगळून उरलेल्या राष्ट्रांचा समूह अगर गट निर्माण करावा अशीहि खटपट कांहीं देशांतून दिसते.

वर आर्थिक धोरणाचीं मुख्य सूत्रें सांगितलीं. त्याची प्रत्यक्ष व्यवहारांत अंमलबजावणी कशी होईल, हें ज्या त्या देशांतील सत्तारूढ राजकीय पक्षांच्या अंतरंगावर अवलंबून राहील. शेतीच्या प्रगतीच्या योजनांचेंच उदाहरण घ्या. राजकीय सत्ता जेथें जमीनदार-वर्गाच्या अगर जमीनदारांचें वर्चस्व असलेल्या राजकीय पक्षाच्या हातीं असेल तेथें मोठमोठ्या जमीनदाऱ्यांचें उच्चाटन होणार नाहीं. तसेंच विकाऊ पिकांऐवजीं खाऊ पिकें काढण्याच्या दिशेनें अत्यंत मंद गतीनें प्रगति होईल. जमीनदारांऐवजीं शेतकरी व कुळें यांचा पाठिंबा असलेल्या पक्षाकडे सत्ता गेल्यास शेतकऱ्यांना जमिनीची मालकी मिळेल. मोठमोठ्या जमीनदाऱ्या नष्ट होतील. लहान शेतकऱ्यांच्या हिताकडे जास्त लक्ष पुरविण्यांत येईल. पूर्व युरोपखंडांत पहिल्या महायुद्धानंतर अशा घटना घडल्या. त्यास 'शेतकरी क्रांति' ' Green Revolution ' असें म्हणतात. थोड्याफार प्रमाणांत हिंदुस्थानांत आज तसेंच होत आहे. भांडवलदार व उद्योगपती यांच्या हातीं सत्ता गेली तर जमिनदारांचें उच्चाटन होण्याचा संभव फार; परंतु विकाऊ पिकांचें उत्पादन कमी होण्याची शक्यताहि कमी. समाजवादी मंडळींच्या हातीं सत्ता गेल्यास जमिनीचें राष्ट्रीयीकरण, सामुदायिक शेती वगैरे मार्गांनीं प्रगति होईल. ब्रह्मदेशांत थोड्या फार प्रमाणांत व चीनमध्यें सर्वस्वीं अशाप्रकारचें धोरण अवलंबिलेलें आढळेल.

औद्योगिक प्रगतीसंबंधींहि अशाच प्रकारचे प्रवाह दिसून येतील. भांडवलदार व उद्योगपती यांच्या हातीं सत्ता आली तर उद्योगधंद्यांना भरपूर संरक्षण मिळेल, राष्ट्रीयीकरण दूर जाईल व खाजगी उद्योगधंद्यास सर्वस्वीं अनुकूल असें धोरण राहील. शेतकरी अगर जमीनदार वर्गाच्या हातीं राजकीय सत्ता आली तर उद्योगधंद्यांसंबंधीं नियंत्रणात्मक धोरण राहील. राष्ट्रीयीकरणाची कांहीं दिशांनीं तरी प्रगति होईल. समाजवादी लोकांच्या हातीं राज्यसूत्रें आली तर राष्ट्रीयीकरणावर सर्वस्वीं भर दिला जाईल.

## दोन विचारसरणींचा संघर्ष

अन्तर्गत परिस्थिति व धोरणें यांसंबंधीं येथवर विवेचन केलें. आतां बहिर्गत परिस्थिति व त्याचे संभाव्य परिणाम यांकडे वळावयाचें. दुसरें महायुद्ध १९४५ मध्यें संपल्यानंतर कांहीं दिवस जागतिक शांततेस अत्यंत आशादायक असे गेले. जगांतील दोन बलाढ्य राष्ट्रें रशिया व अमेरिका बऱ्याच अंशीं सहकार्यानें राजकारण करीत होतीं; तथापि लवकरच ही परिस्थिति बदलली आणि त्यांच्यांत बेबनाव होऊन तेढ निर्माण झाली. त्यामुळ जगांत आज दोन तट पडले आहेत. हे पडण्यास कोण कारणीभूत झाले व त्यांत कोणाचा मुख्य दोष होता यांत शिरण्याचें कारण नाहीं. कारण दोन्ही पक्षांनीं चुका केल्या व त्यामुळेंच परिस्थिति बिघडली असें म्हणावें लागेल. तथापि, गेल्या ४–५ वर्षांतील घटनांवरून हा संघर्ष खरा दोन तत्त्वज्ञानांचा आहे असें दिसतें. खासगी उद्योगधंदे व राजकीय क्षेत्रांत लोकशाही हीं अमेरिकन गटाचीं सूत्रें, तर सर्वंकष आर्थिक, सामाजिक व राजकीय नियंत्रण व सर्वाधिकारशाही ही रशियन अगर कम्युनिस्ट गटाचीं सूत्रें. या मूलभूत मतभेदांतून इतर कारणें निर्माण झालेलीं आहेत. दोन बलाढ्य राष्ट्रांतच तंटा असल्यामुळें एकाचा फायदा तो दुसऱ्याचा तोटा म्हणून प्रत्येक लहानसहान बाबतींतहि आपला आग्रह न सोडण्याचा हट्ट, या तेढीमुळें जागतिक परिस्थिति अगदीं चिघळून गेली आहे. पश्चिम युरोपांतील राष्ट्रांवर रशियाचें आक्रमण होईल या भीतीनें











अमेरिकेनें त्यांच्याशी लष्करी करार करून, मार्शल-योजनेप्रमाणें त्यांच्या आर्थिक पुनरुज्जीवनास फार मोठी मदत केली. त्यामुळें युरोपांत रशियाची नाकेबंदी झाली. परंतु इकडे चीनमध्यें कम्युनिस्टांची सरशी होऊन तिकडे रशियाचें वजन शतपटींनीं वाढलें व सर्वच आशियांतील देशांवर कम्युनिझमची छाया पडली. त्यास तोंड देण्यासाठीं आतां या देशांनाहि मोठ्या प्रमाणावर आर्थिक मदत करण्याच्या दिशेनें अमेरिकेचीं पावलें पडत आहेत. चीनमधील क्रान्तीमुळें युरोपप्रमाणें आशिया खंडांतहि रशिया व अमेरिका यांचा संघर्ष सुरू झाला आहे. या दोन बलाढ्य राष्ट्रांचें युद्ध आग्नेय आशियांतच लढलें जाण्याचा संभव त्यामुळें पुष्कळच बळावला आहे. कोरिआमधील युद्ध या संग्रामाची नांदी तर नसेल ?

दोन बलाढ्य राष्ट्रांच्या या खेंचाखेंचींत आग्नेय आशियांतील राष्ट्रांना, इच्छा असो अगर नसो, भाग घ्यावा लागेल अगर त्यांत होरपळावें लागेल. आग्नेय आशियांतील राष्ट्रांच्या दृष्टीनें विचार केल्यास त्यांस यांपैकीं कोणत्या राष्ट्राचें जास्त आकर्षण ( राजकीय व आर्थिक ) वाटेल यासंबंधीं थोडा विचार केला पाहिजे. प्रत्येकाचें आकर्षण निराळें आहे. अमेरिकेची संपन्नता व सामरिक सामर्थ्य यांसंबंधीं आग्नेय आशियांतील राष्ट्रांमध्यें आदर व विश्वास आहे. तीं बहुतेक राष्ट्रें समुद्रकांठीं आहेत व सामर्थ्यवान् नौ-दल असलेल्या राष्ट्रांस त्यांजवर आपलें वर्चस्व प्रस्थापित करतां येईल. अमेरिकेजवळ प्रबळ नौ-दल आहे. अमेरिका त्यांना संरक्षण व युद्धसामग्री पुरवूं शकेल. या राष्ट्रांच्या आर्थिक विकासासाठीं पुष्कळ मोठ्या प्रमाणावर अमेरिका मदत करूं शकेल. याउलट रशियाबद्दलहि या देशांना जबरदस्त आकर्षण आहे. प्रथमतः रशिया खुद्द आशियाच्या भूमीवर उभा आहे व आग्नेय आशियांतील कित्येक राष्ट्रांचा तो शेजारी आहे. सोव्हिएट क्रान्तीनंतर तेथें झालेले नियोजित आर्थिक विकास व दारिद्र्यनाश यांसंबंधीं आग्नेय आशियांतील जनतेस फार मोठें आकर्षण वाटतें. त्याच मार्गानें आपल्या दारिद्र्याचा नाश होईल अशी आशा तिच्या मनांत जागृत आहे. दारिद्र्यपीडित जनतेस कम्युनिझमच्या तत्त्वज्ञानासंबंधीं जबरदस्त आकर्षण असतें. कम्युनिस्ट नेत्यांबद्दल व त्यांच्या सचोटीबद्दलहि आदर आढळतो. चीनमध्यें हें पहावयास मिळतें. सध्यां सत्ताधारी असलेल्या राजकीय गटांपेक्षां कम्युनिस्टांचें ध्येय व त्यांची वागणूक तीस अधिक मोह घालते. सर्वाधिकारशाहीस पोषक अशीच सामाजिक परिस्थिति या देशांतून असल्यामुळें रशिया व कम्युनिझम यांजबरोबर येणाऱ्या या संकटाची येथील जनतेस भीति वाटत नाहीं. किंबहुना त्याची त्यास जाणीवहि नाहीं. रशियाच्या आक्रमणास तोंड देण्यासाठीं अमेरिकेची मदत मिळेल हें खरें. परंतु त्यास फार विलंब लागला तर त्याचा फारसा उपयोग होण्याचा संभव नाहीं. ' हिमवति दिव्यौषधयः शीर्षे सर्पः समाविष्टः' !

या सार्वराष्ट्रीय राजकारणांतील परिस्थितीचे दूरगामी परिणाम आग्नेय आशियांतील देशांच्या भवितव्यावर होतील हें उघड आहे. सध्यांच्या जागतिक राजकाणांतील दोन बलाढ्य तट लक्षांत घेतां या देशांतील राज्यकर्त्यांना कोणत्या ना कोणत्या तरी गटांत, इच्छेनें वा अनिच्छेनें, सामील व्हावेंच लागेल. कोणत्याहि गोटांत न जातां आम्ही मधला मार्ग स्वीकारूं अशा प्रकारच्या घोषणा झाल्या तरी तदनुसार फारशी कृति होण्याचा संभव कमी. जागतिक राजकारणांत स्वतंत्रपणें भाग घेऊन त्यास आपल्या इच्छेप्रमाणें वळण लावण्यासाठीं लागणारें बलशालित्व आग्नेय आशियांतील कोणत्याहि एका राष्ट्राजवळ अगर राष्ट्रांच्या गटाजवळ नाहीं. दोन्हींपैकीं कोणत्या गटांत सामील व्हावयाचें हें त्या त्या देशांतील राज्यकर्त्यांच्या आर्थिक व सामाजिक धोरणांवरूनच ठरेल. कारण वर सांगितल्याप्रमाणें सध्यांच्या जगांतील कलह हा मुख्यतः दोन तत्त्वज्ञानें व विचारसरणी यांमधील आहे. भांडवलशाही व वि-नियंत्रण यांकडे झुकता कांटा असलेलें आर्थिक धोरण ज्या देशांतून आहे तो देश अमेरिकन गटांत बहुधा जावयाचा. याउलट ज्यांचें धोरण कमी-अधिक प्रमाणांत साम्यवादी समाजरचनेकडे झुकतें आहे त्यास रशियाच्या गटांत बहुधा जावें लागेल.

## आर्थिक विकासाचा तांतडीचा प्रश्न

सध्यांची आग्नेय आशियांतील राजकीय व आर्थिक परिस्थिति लक्षांत घेतली तर तेथील मुख्य



अनुक्रमणिका







## आग्नेय आशियापुढील प्रश्न

प्रश्न त्वरित आर्थिक विकासाचा आहे. त्यांतूनच तेथील राजकीय प्रश्न सुटण्यास मदत होईल. आग्नेय आशिया व जगांतील इतर दारिद्र्यपीडित विभाग यांमधील आर्थिक विकासाचा प्रश्न, तेथील तुटपुंजी नैसर्गिक साधनसंपत्ति आणि अगोदरच फाजील असलेली व वाढणारी लोकसंख्या, या व्यस्त प्रमाणांत सामावलेला आहे. ही समस्या सोडविण्याचा एकमेव मार्ग आर्थिक व्यवहारांचें नियंत्रण व योजनाबद्ध विकास हा आहे. या प्रदेशांत अनिर्बंध आर्थिक व्यवहाराच्या पद्धतींतून विकास त्वरेनें होण्याचा व त्यामुळें तेथील परिस्थिति सुधारण्याचा संभव फार कमी आहे. परिस्थिति आहे तशीच राहिली अगर जास्त चिघळली तर या प्रदेशामधील राजकीय, आर्थिक व सामाजिक असंतोष वाढेल व त्यामुळें राजकीय अस्थैर्य वाढेल. आणि मग शांततामय संक्रमण होण्याची शक्यता दूरावेल.

जगांतील दारिद्र्यपीडित प्रदेशांच्या विकासासाठीं अमेरिका आज ज्या योजना आंखीत आहे त्यांकडे दृष्टिक्षेप केल्यास त्या योजना या प्रदेशांतील परिस्थितीच्या निकडीच्या मानानें अत्यंत अपुऱ्या व तुटपुंज्या आहेत असें दिसेल. प्रे. ट्रुमन यांच्या घोषणेंतील चौथ्या कलमानुसार या प्रदेशाच्या आर्थिक विकासासाठीं तांत्रिक मदत करण्याची योजना आंखली जात आहे. त्यासंबंधीं जास्त विस्तार करण्यास येथें अवकाश नाहीं. थोडक्यांत सांगावयाचें तर, या योजनेची पश्चिम युरोपासाठीं केलेल्या मार्शल योजनेशीं तुलना केल्यास ही किती अपुरी व चालचलाऊ आहे हें सहज कळण्यासारखें आहे. शिवाय अमेरिकेचें धोरण अनिर्बंध आर्थिक व्यवहाराकडे झुकतें असल्यामुळें व मदत देतांना अशा प्रकारची व्यवस्था मदत दिलेल्या देशांनीं स्वीकारावी असा थोड्याफार प्रमाणांत अमेरिकेचा कटाक्ष असल्यामुळें, वर सांगितल्याप्रमाणें, या मदतींतून प्रत्यक्षांत परिस्थिति सुधारण्यास फारशी मदत होण्याचा संभव कमी. अमेरिकेचें हें धोरण बदलून या प्रदेशांच्या विकासासाठीं तिच्याकडून हल्लींपेक्षां पुष्कळच मोठ्या प्रमाणावर मदत नजीकच्या काळांत झाली तरच सांप्रतची परिस्थिति सुधारण्याचा संभव निर्माण होईल. ती होईल कीं नाहीं व झाल्यास वेळ निघून जाण्यापूर्वी ती होईल कीं काय, हें सांगणें सध्यां तरी कठिण आहे. तात्कालिक परिस्थिति लक्षांत घेतली तर आग्नेय आशिया व इतर दारिद्र्यपीडित प्रदेश यांमधील संक्रमण व विकास शांततामय मार्गानें होण्याचा संभव दूरावत चालला आहे असेंच म्हटलें पाहिजे.

---

## कोशकार व शब्द

कोशकार शब्दांना म्हणाला, ' तुम्हांला शिस्त नाहीं. '
त्यानें प्रत्येक शब्दाला शिस्तशीर उभें केलें.
' आतां कोणी हालूं नका. जागा सोडूं नका. नाहीं तर सारी रचना मला पुन्हां करावी लागेल ', त्यानें आज्ञा केली.
शब्द कांहीं क्षण शांत राहिले.
नंतर एक लहानसा शब्द म्हणाला : ' भगवन्, एक शंका विचारूं का ? '
' कोणती ? '
' माझ्या अर्थपरिवारांतील माझा निश्चित अर्थ कोणता ? '
कोशकारानें खूप विचार केला. आणि अखेर तो म्हणाला : ' तें मला सांगतां येत नाहीं. जीवनाच्या धकाधकींतच प्रतिक्षणीं त्याचा निर्णय तुला घ्यावा लागेल.'
—आणि सारे शब्द त्यानें कोशांतून मोकळे केले.

—देवदत्त दाभोलकर








गांधीजींच्या लेखाचा अनुवाद : अनु. श्री. ना. ग. जोशी

# थोरो आणि सविनय कायदेभंग

**प्रस्तावना**[1]

विचार, वाणी आणि वर्तन यांत एकता साधणाऱ्या अमेरिकेंतील फार विरळ साधुपुरुषांमध्यें धुरंधर असा हेन्री डेव्हिड थोरो हा १९ व्या शतकाच्या मध्यभागांत होऊन गेला. सत्याच्या निडर निष्ठेमुळें त्याच्या विचारांत जेवढा जोर होता तेवढाच त्याच्या वाणींत व वर्तनांतहि होता. त्याचें लिखाण विचारांची खाण आहे. त्याच्या शब्दाशब्दांतून अग्नि झरतो. यामुळेंच लाखों माणसें तें वाचतात आणि मनन करतात. त्याच्या ज्या प्रसिद्ध लेखाचा सारांश देण्याचा हा प्रयत्न आहे. त्याचा प्रसंग थोडक्यांत असा आहे :

अमेरिकेच्या संयुक्त संस्थानांतील मॅसॅच्युसेट्सचा हा रहिवाशी होता. या संयुक्त संस्थानांनीं मेक्सिकोविरुद्ध ज्या तऱ्हेनें लढाई पुकारली ती त्याला न्यायाविरुद्ध वाटत होती. गुलामगिरीचें अस्तित्व म्हणजे एक घोर, क्रूर अन्याय असें तो मानीत होता आणि मॅसॅच्युसेट्सच्या राज्यसत्तेनें गुलामांचें अस्तित्व व मालकी यांना पाठिंबा दिला होता. म्हणून त्यानें निश्चय केला कीं, या राज्याला कर देणें बंद करून राज्याच्या धोरणाचा आणि तद्द्वारा त्याच्या सत्तेचा अनादर करावा, आणि अशा प्रकारें राज्याच्या अत्याचारांत भागीदार बनूं नये. या निश्चयाप्रमाणें त्यानें, कर वसूल करणारा अंमलदार आला, तेव्हां त्याला सांगितलें : “ जोंवर माझ्या पैशाचा उपयोग लढाईच्या खर्चासाठीं किंवा गुलाम खरीदण्यासाठीं व्हावयाचा आहे तोंवर तुला कर वसूल करतां येणार नाहीं. ” कर वसूल करणारा गोंधळून विचारूं लागला : “ तर मग मीं काय करावें ? ”. “ तूं आपल्या जागेचा राजीनामा द्यावास, दुसरें काय ? ”. परिणामीं थोरोला तुरुंगांत जावें लागलें. तुरुंगांत त्याचा मित्र इमर्सन त्याला

---

[1] श्री. महादेवभाई देसाईंची ‘ डायरी ’ ( भाग ४ था ) नुकतीच प्रसिद्ध झाली. त्यांत ता. १५-२-१८ ची आणि ता. ९-८-१८ ची अशा दोन नोंदी पुढीलप्रमाणें आहेत :

“ आज थोरोच्या ‘ ड्यूटी ऑफ सिव्हिल डिस्ओबीडिअन्स ’ या पुस्तकाचा बापूंनीं ‘ इन्डिअन ओपिनिअन ’ मध्यें गुजरातींत केलेला संक्षिप्त अनुवाद वाचला. तो पुन्हां-पुन्हां वाचण्यासारखा व विचार करण्यासारखा आहे...थोरो इमर्सनहूनहि वरचढ आहे. इमर्सनच्या लिखाणांतून दहीदुधीपणा ( नरमपणा ) दिसतो. थोरोच्या वाक्यावाक्यांतून अग्नि झरत आहे. त्याचें रोज पारायण केलें पाहिजे. लाख वेळां वाचला तरीहि त्यांतील रस कमी होणार नाहीं. ”

पुढें लगेच महादेवभाईंनीं तो गांधीजींचा गुजराती अनुवाद ( सुधारलेला ) समग्र उतरून काढला आहे. त्यावरून हा मराठी अनुवाद श्री. ना. ग. जोशी यांनीं केला असून तो “ नवजीवन ” कार्यालयाच्या संमतीनें येथें दिला आहे.

—का. सं.

भेटायला गेला व त्यानें विचारलें, " हेन्री, तूं येथें कसा ? " थोरोनें उत्तर दिलें, " तूं कसा येथें नाहींस ? " तुरुंगांत त्याच्या मनांत जे विचार आले ते म्हणजेच हा लेख होय. इतिहासकार असें म्हणतात कीं, अमेरिकेंतून गुलामगिरी बंद व्हावयाचें मुख्य कारण थोरोला घडलेला हा कारावास आणि तुरुंगांतून सुटून आल्यावर झालेलें या लेखाचें प्रकाशन, हें होतें. लेख वाचतांच समजून येईल कीं, आपल्या देशाच्या सध्यांच्या परिस्थितींत हा लेख लोकांपुढें ठेवावयाला हीच वेळ योग्य आहे. थोरोच्या लेखाचा अनुवाद पुढें दिला आहे :

### राज्यसत्ता आणि जनता

" मला हें संपूर्णपणें मान्य आहे कीं, लोकांवर राज्यसत्तेची हुकमत जेवढी कमी तेवढें तें राज्य चांगलें; म्हणजे असें कीं राज्यसत्ता हा एक प्रकार-चा रोग आहे, आणि त्या रोगांतून रयत जेवढ्या प्रमाणांत मुक्त होऊं शकेल तेवढ्या प्रमाणांत त्या राज्याला वाखाणतां येईल. पुष्कळ माणसें असें म्हणतात कीं, अमेरिकेंत लष्कर नसेल किंवा कमी असेल तर चांगलें. ही गोष्ट खरी आहे. पण एवढीच गोष्ट सांगणाऱ्याचें म्हणणें चुकीचें आहे. ते असें म्हणतात कीं राज्यसत्ता लाभदायक आहे, पण तिचें लष्कर हानिकारक आहे. ह्या लोकांच्या लक्षांत येत नाहीं कीं लष्कर हें राज्यसत्तेचें शरीर आहे आणि त्यावांचून ती सत्ता घटकाभरहि टिकूं शकणार नाहीं. पण आपण स्वतः या राज्यसत्तेच्या हुकमतीमुळें दबून गेलेले असल्यामुळें ही गोष्ट आपल्या नजरेस येत नाहीं. खरें पाहतां लष्कर व राज्यसत्ता या दोहोंना आपण—म्हणजे रयतच—टिकवून धरीत असतों.

" तेव्हां आपण पाहिलें कीं, आपण स्वतःच फसलें जात असतों. अमेरिकेच्या राज्यानें ( संस्था-नानें ) कोणतेंहि साहस आपण होऊन अंगावर घेत-लेलें असतें असें नाहीं. त्यांनीं आपणाला स्वतंत्र ठेवलें नाहीं, कीं आपणाला शिक्षण दिलें नाहीं. आज आपल्यांत जें कांहीं आहे तें राज्यामुळें आलेलें नाहीं, तर आपल्या स्वतःमध्यें जें कांहीं चैतन्य आहे त्यामुळें होय. उलट राज्यसत्तेमुळें आपल्या शिक्षणांत व हुषारींत कांहींशी उणीव आली आहे.

### रयतेचा हक्क : उत्तम राज्यकारभाराची मागणी

" असें असूनहि मी राज्य जमीनदोस्त करावें असें म्हणत नाहीं. सध्यां तरी तावडतोब चांगला राज्यकारभार मागतों. तो मागायचें प्रत्येकाचें कर्तव्य आहे. ज्या देशांत बहुमताच्या जोरावर सर्व गोष्टी मिळतात तेथें न्यायच केला जात असेल असें मानणें चूक आहे आणि ती चूक नजरेला न आणल्यानें पुष्कळ अन्याय घडतात. बहुसंख्याक माणसें जें करतात तें खरेंच असलें पाहिजे अशी समजूत—म्हणजे लोकभ्रम—आहे. असें राज्य असूं शकणार नाहीं का कीं जेथें बहुसंख्याक माणसें म्हणतात तसें होण्याऐवजीं जें खरें असेल त्याचाच अंमल होत राहील ? माणसानें आपला आत्मा राज्य-कर्त्यांना विकून टाकला आहे काय ? असें जर असेल तर आपण माणूस कसले ? मी तर असें म्हणतों कीं आपण पहिल्यांदा माणूस आणि मग रयत. कायद्याला मान द्यावयाची जरूरी मला मुळींच दिसत नाहीं. सत्याला मान द्यावयाची जरूरी सदा सर्वदा असते. मला एकच कर्तव्य असूं शकतें व तें हें कीं, जें सत्य असेल तेंच मीं करावें. कायद्यानें माणूस अधिक न्यायी झाल्याचें मी केव्हांहि पाहिलें नाहीं; पण मीं असें पाहिलें आहे व पाहत आहे कीं साधारणपणें न्यायी बुद्धीचीं माणसें आपल्या भोळेपणामुळें अन्यायाचा फैलाव करण्यांत साधनभूत होतात. कायद्याला बेहद्द मान देण्याचा परिणाम आपणाला असा दिसत आहे कीं, राज्यानें लढाई पुकारली कीं बाहुल्यांप्रमाणें आपण लष्करांत उडी घेतों आणि तोंड बांधून वरिष्ठ अधिकाऱ्यांचे हुकूम पाळतों. पुष्कळ लोकांचा तर धंदाच लष्कराची नोकरी हा आहे. मग अमुक लढाई वाईट आहे, असें नक्की वाटत असतांहि ते त्यांत ओढले जातात. अशांना आपण माणसें म्हणणार कीं कसायांच्या हातांतील कुऱ्हाडी म्हणणार ? अशीं माणसें लांकडें किंवा विटकरांप्रमाणें आहेत. अशा माणसांना मान कसा द्यावयाचा ? पशूं-पेक्षां त्यांची किंमत जास्त कशी म्हणतां येईल ? आणखी कित्येक कायद्याचे पुरस्कर्ते बनतात, वकील होतात, परराष्ट्रीय वकील बनतात. ते आपल्या अकलेनें राज्याचें रक्षण करण्याची बढाई मारतात, पण मला दिसत आहे कीं ते विचार न करतां व








न समजतां सैतानाची सेवा करीत आहेत. आपले वीर, आपले देशभक्त, आपले महान् सुधारक यांमध्यें खरे मर्द विरळाच आहेत, कीं जे सत्याच्या द्वारें राज्याची सेवा करूं इच्छितात आणि ज्यांना नेहमीं राज्याला विरोध करूनच ती सेवा करावी लागते. साधारणपणें राज्य अशा लोकांना आपले शत्रू समजतें.

"शहाणा माणूस शूराच्या पद्धतीनेंच काम करील, दुसऱ्यानें नाचवल्यानें नाचणार नाहीं. या अमेरिकेच्या राज्याला टिकवून धरण्यासाठीं जो माणूस यत्न करतो तो नामर्द समजावा. जें राज्य गुलामांवर सत्ता गाजवतें तें माझें राज्य असें मी कधींहि म्हणूं शकणार नाहीं. जेव्हां अत्यंत जुलूम होतो तेव्हां जुलमी राज्याला विरोध करणें हा माणूस-जातीचा हक्क आहे. कित्येक माणसें म्हणतात कीं, अमेरिकेचें हल्लीचें राज्य तसें जुलमी नाहीं; त्यांच्या असें म्हणण्याचें कारण एवढेंच कीं, त्या लोकांवर हल्ला होत नाहीं. पण इतरांवर होतो, याची असें बोलणारांना फिकीर नसते.

## गंजानें खाल्लेलें राज्ययंत्र

"जसा प्रत्येक यंत्रांत थोडाबहुत गंज असतोच तसाच तो राज्ययंत्रांतहि असतो. तो गंज नाहिसा करण्यासाठीं विरोध करण्याची जरूरी कोणाला न वाटो ! पण जेव्हां गंजच यंत्र बनतो, जुलुमच कायद्याचें रूप घेऊं लागतो तेव्हां तें राज्य मर्दांना खपणार नाहीं. 'देह जावो अथवा राहो' तरीहि मी न्यायच करीन, हें सत्य पाळावें. मी बुडत्या माणसापासून त्याचा भोपळा हिरावून घेतला असेल, तर माझा जीव गेला तरी चालेल पण मीं तो त्याला परत दिला पाहिजे. तसेंच अमेरिकेचें राज्य बुडूं लागलें तरीहि तिनें गुलामांना मोकळें केलेंच पाहिजे.

## सत्याचा आचार करणारे हवेत

"आपण बोलतों कीं समाज अमुक कामा-साठीं तयार नाहीं; पण चांगलें करायला नेहमीं वेळच लागतो. कारण जे थोडे लोक सुधारणा करूं पाहतात ते सर्व बहादूर असत नाहींत. सर्व लोक तुमच्याएवढे शूर वीर झाले नाहींत तरी फिकीर नाहीं, पण समाजांत कांहीं जण तरी संपूर्ण शुद्ध असावे लागतात. जसा एक आंबवणाचा बिंदु पिठांत मिसळला जाऊन सबंध पाव फुलवतो, तसे हे लोक समाजांत मिसळले जाऊन सबंध समाजाला वर आणतात. असे हजारों आहेत कीं, ज्यांचे विचार गुलामीविरुद्ध आहेत, पण ज्यांचें आचरण स्वतःच्या विचारांविरुद्ध आहे ते स्वतःला वॉशिंग्टन नि फ्रँकलिन यांचे वंशज म्हणवितात ! आणि खिशांत हात अडकवून मौज करीतच असतात ! आजचे देशसेवक आणि प्रामाणिक माणसें कशीं आहेत ? त्यांचीं मनें लेचीपेचीं आहेत. दिलगिरीचे ठराव पसार करतात, नि अर्ज करतात; पण कोणत्याहि गोष्टींत त्यांचें मन नसतें. मग त्यांत सत्त्व कसें असणार ? कोणी दुसरा आपलें दुःख निवारण करणारा यावा म्हणजे आपल्या पायाखालीं लोंढा येऊन आपण वाहून जाऊं नये याची ते वाट पाहत बसतात.

"जगांत हजारपैकीं नऊशें नव्याण्णव लोक सत्याच्या गोष्टी बोलणारे असतात, आचरणारा एकच असतो. पण सत्याच्या गोष्टी बोलणाऱ्या हजारांपेक्षां आचरणाऱ्या एकाची किंमत पुष्कळ जास्त आहे. खजिन्याचें रक्षण करणारे बरेच असतील पण त्यामुळें त्यांतील एक पैहि कांहीं त्यांना घेतां यावयाची नाहीं ! खजिन्याचा मालक एक असेल. पण तो सगळा खजिना लुटवूं शकेल !

"माणसानें सत्याच्या बाजूनें मत दिलें म्हणजे कांहीं तो सत्य आचरतो असें म्हणतां येणार नाहीं. जोंपर्यंत स्वतःचें मत सिद्ध करावयाची त्याच्यांत हिंमत असत नाहीं तोंपर्यंत त्या मतांत कांहीं अर्थ नाहीं. बहुमताच्या निर्णयावरून आपलें स्वतःचें तत्त्व सोडण्याऐवजीं त्यानें एकट्यानें झगडलें पाहिजे. बहुमतानें जें काम होत असेल त्यांत करवून घेण्यासारखें काय राहिलें ? जेव्हां पुष्कळ माणसें गुलामगिरी रद्द करावयास मत देतील तेव्हां समजावें कीं, आतां गुलामगिरी रद्द करवून घेण्याचें कारण राहिलें नाहीं. त्याविरुद्ध झगडणाऱ्या एका सच्चा माणसानेंच तिचें मूळ खणून काढलें होतें असें समजलें पाहिजे.

"मी असें म्हणत नाहीं कीं, प्रत्येक माणूस जेथें जेथें खोटें पाहील तेथें तेथें तें दूर करावयाला बांधलेला आहे; पण मी एवढें नक्की सांगतों कीं, त्या खोट्या किंवा वाईट गोष्टींत स्वतः भाग न

घ्यावयाला तो बांधलेला आहे. माणूस केवळ विचार करून थांबला नि त्याप्रमाणें वागला नाहीं तर, त्यांत काय स्वारस्य ? जर माझा माल कोणी चोरून नेऊं लागलें तर तें अयोग्य आहे असें म्हणून मी स्वस्थ बसत नाहीं. तर तो माल परत मिळविण्यासाठीं व पुन्हां चोरीला न जाण्याचा बंदोबस्त करण्यासाठीं मी प्रयत्न करतों. जो माणूस बोलतो तसें करतो तो निराळ्याच जातीचा बनतो. असा माणूस देशाची, नात्याची किंवा मित्राची पर्वा ठेवीत नाहीं. सत्याची सेवा करीत तो सर्वांची सेवा करतो.

## जुलमाविरुद्ध झगडलें पाहिजे

" जुलमी कायदा आहे असें आपण कबूल करतों. त्याविरुद्ध आपण उभे राहूं का ? साधारणपणें माणसें म्हणतात कीं, जेव्हां पुष्कळ माणसें तो कायदा नापसंत करतील तेव्हां तो रद्द होईल. ते म्हणतात कीं, जर आपण विरोध केला तर कायद्याच्या अनिष्टतेपेक्षां या विरोधामुळें अधिक अनिष्टता उत्पन्न होईल. पण तसें झाल्यास तो विरोध करणाराचा दोष नव्हे, दोष अंमलदाराचा होय.

" मी बेधडक असें म्हणतों कीं, मॅसॅच्युसेट्स्मध्यें एक हजार माणसें, शंभर माणसें, एवढेंच कशाला दहाच माणसें—दहा प्रामाणिक माणसें, नव्हे, एक देखील प्रामाणिक माणूस—गुलामगिरीच्या विरुद्ध असेल, तो जर कर न देतां गुलामीच्या भागीदारींतून आपलें अंग काढून घेईल, तर आजच अमेरिकेंतून गुलामगिरी नेस्तनाबूद होईल. दुसरे आपल्या मताचे होईपर्यंतहि न थांबतां त्यानें गुलामांच्या मालकीच्या पापांत सामील होतां कामा नये. कारण तो एकटा नसतो. त्याच्याबरोबर ईश्वर नेहमींच असतो. मी जर इतरांहून अधिक सच्चा असेन तर मी इतर सर्वांपेक्षां अधिक उन्नत असणार. वर्षांतून एकदांच माझा राज्यसत्तेशीं संबंध येतो; जेव्हां राज्याचा प्रतिनिधि कर वसूल करावयाला माझ्याकडे येतो तेव्हां. त्यावेळीं मी त्याला, कर द्यायचा नाहीं, असें म्हटलेंच पाहिजे. जर एक हजार माणसें कर भरणें नाकारूं लागलीं तर त्यांत अत्याचार मुळींच नाहीं. पण राज्य जो अत्याचार करतें त्यासाठीं कर दिल्यानें मदत केल्यासारखें होत असल्यानें कर देण्यांतच अत्याचार आहे.

" मला माहीत आहे कीं, मॅसॅच्युसेट्स्मध्यें एकच खरा बहाद्दर वीर गुलामगिरीविरुद्ध उभा राहून कर न देतां तुरुंगांत जाईल तर त्याच दिवशीं गुलामांची बेडी तुटायला सुरुवात होईल. जी गोष्ट यथायोग्य करण्यांत येते तीच खरी असें म्हणतां येईल. पण आपण तर केवळ लंब्याचवड्या गप्पा मारून असें मानतों कीं, गप्पा हेंच आपलें काम आहे. गुलामगिरीची बेडी तोडून टाकावयाला पाठिंबा देणारीं अनेक वृत्तपत्रें आहेत, पण एकहि मर्द नाहीं.

## तुरुंग हें सच्च्या माणसांचें घर

" ज्या राज्यांत खोट्या मार्गानें माणसांना तुरुंगांत टाकलें जातें त्या राज्यांत न्यायी व चांगल्या माणसांचें घर तुरुंग हेंच होय. म्हणूनच मॅसॅच्युसेटसमध्यें आज सर्व चांगल्या माणसांचें स्थान जेलमध्यें असलें पाहिजे. गुलामी राज्यांत माणूस तुरुंगांतच स्वतंत्र असतो, तेथेंच त्याचा मान असतो. जे असें मानतात कीं, चांगलीं माणसें तुरुंगांत गेल्यास मागाहून अन्यायाविरुद्ध लढा करायला कोणी राहणार नाहीं, त्यांना लढा कसा चालतो याची कल्पना नाहीं. त्यांना खऱ्याची सत्ता खोट्यावर कशी चालते याचा अंदाज नाहीं. तुरुंगांत गेलेले व अन्यायी जुलमाचा अनुभव घेणारे जेलमध्येंच जेवढें काम करूं शकतात तेवढें जेलबाहेर त्यांना करतां येणार नाहीं. थोडीं विरुद्ध विचाराचीं माणसें पुष्कळांच्या बरोबरच ओढलीं जातात तोंवर त्यांना विरुद्ध विचाराचीं म्हणतांच येणार नाहीं. त्यांनीं आपलें सर्व वजन विरुद्ध दिशेला गति देण्याकडेच वापरलें पाहिजे.

" माझ्या शेजाऱ्यांजवळ मी गप्पागोष्टी करतों तेव्हां मला कळून चुकतें कीं, विरोध केल्यास आपण आपलें सर्वस्व गमावून बसूं. आपलीं बायकापोरें भिकेला लागतील, अशी त्यांना भीति वाटत असते. मला जर माझ्यासाठीं व माझ्या कुटुंबासाठीं राज्याचा अशा तऱ्हेनें आधार घ्यावा लागला तर मात्र मी निराशच होऊन जाईन.

## जुलमी राज्याची सत्ता मानूं नका

" मला वाटतें कीं जुलमी राज्याच्या ताब्यांत

[ पुढील मजकूर पान १६ वर पहा. ]






प्रा. वा. वि. मिराशी

# शालिवाहन शकाची पूर्वपीठिका

दक्षिण हिंदुस्थानच्या बऱ्याचशा भागांत सध्यां प्रचलित असलेला शालिवाहन शक इ. स.च्या पहिल्या शतकांत शालिवाहन नामक राजानें स्थापला अशी परंपरागत समजूत आहे. हा शालिवाहन पैठण नगरीं राज्य करीत होता असेंहि मानण्यांत येतें. पुराणें, कथासरित्सागर व बृहत्कथामंजरी यांसारखे संस्कृत ग्रंथ आणि जैनांचें कल्पप्रदीप व निर्युक्ति इत्यादि टीकाग्रंथ यांत पैठणच्या सातवाहन राजाच्या कथा आल्या आहेत. तो सातवाहन व शकसंस्थापक शालिवाहन एकच होत असेंहि म्हणतात. सातवाहन हें कुलनाम होतें. हें कुल सातवाहन नामक राजापासून निघालें असल्यानें त्याचें नांव त्या कुळाला देण्यांत आलें असावें. चार-पांच वर्षांपूर्वींपर्यंत हा सातवाहन पूर्णपणें अज्ञात होता. पण अलीकडे त्याचीं तीन नाणीं हैदराबाद संस्थानांत औरंगाबाद, मेडक व वारंगळ जिल्ह्यांत सांपडलीं आहेत त्यांवरील अक्षरवटिकेवरून तो सम्राट् अशोकानंतर लौकरच होऊन गेला असें दिसतें. पण या सातवाहन राजानें किंवा त्याच्या कोणी वंशजानें सध्यां दक्षिणेंत प्रचलित असलेला शालिवाहन शक चालूं केला, असें दिसत नाहीं. कारण तसें असतें तर, या वंशाच्या एखाद्या तरी कोरीव लेखांत या शकाला अनुसरून कालगणना केली असती. पण सातवाहनाच्या एकाहि लेखांत या काळाचा उल्लेख नाहीं. शालिवाहन राजाचें नांवहि इ. स.च्या तेराव्या शतकांत म्हणजे या संवताच्या स्थापनेपासून सुमारें बाराशें वर्षांनंतर यादवनृपति कृष्ण याच्या मांडलिकाच्या एका ताम्रपटांत त्याशीं संलग्न झालेलें प्रथम आढळतें.[1] त्यापूर्वींच्या सर्व लेखांत या संवताला 'शककाल' किंवा 'शक-नृपकाल' म्हटलें आहे व त्याच्या वर्षांना 'शकवर्ष', 'शकनृपतिसंवत्सर' किंवा 'शकनृपति-राज्याभिषेकसंवत्सर' असें उल्लेखिलें आहे. तेव्हां हा काल कोणा शकनृपतीनें चालूं केला असून कित्येक शतकांनंतर शालिवाहनाचें नांव त्याला जोडण्यांत आलें हें स्पष्ट आहे.

या कालाचा संस्थापक शक राजा कोण होता व तो कोठें होऊन गेला याविषयीं विद्वानांत मतभेद आहेत. तथापि, पुष्कळ संशोधकांच्या मतें तो कुशानवंशी कनिष्क असावा. या कनिष्काचें विस्तृत साम्राज्य उत्तर हिंदुस्थानांत वायव्य प्रांतापासून मगधापर्यंत पसरलें होतें. यानें स्थापिलेल्या शकाचा उपयोग त्याच्या हुविष्क, वासुदेव इत्यादि वंशजांनीं आपल्या लेखांत केला आहे. हे राजे शकवंशी नसून कुशानवंशी होते हें खरें; पण इतर भारतीय संवतांप्रमाणें या संवताचें 'शक' हें नांव आरंभींच्या लेखांत येत नाहीं. तें साडेचारशें वर्षां-नंतरच्या लेखांत प्रथम आढळतें. आभीरांनीं स्थापिलेल्या संवताला जसें पुढें कलचुरि राजांनीं त्याचा उपयोग केल्यामुळें 'कलचुरि' हें नांव प्राप्त झालें, तसेंच या संवताचा पुढें शक राजांनीं उपयोग केल्यामुळें त्याला 'शक' हें नांव पडलें असावें.

---

१ तासगांव ताम्रपट शके ११७२ (इ. स. १२५०) पहा—'दक्षिणच्या मध्ययुगीन इतिहासाचीं साधनें', खंड ३, पृ. ६५.



अनुक्रमणिका






# शालिवाहन शकाची पूर्वपीठिका

कुशानवंशाचा असा अस्त झाल्यावर उत्तरेंत या संवताचा हळूंहळूं संकोच होत गेला. मध्य हिंदुस्थानांत राज्य करणाऱ्या मघ राजांचे कांहीं कोरीव लेख अलीकडे सांपडले आहेत; त्यांत एका विशिष्ट संवताचा उपयोग केलेला आढळतो तोहि हा शकसंवतच असावा हें प्रस्तुत लेखकानें इतरत्र दाखविलें आहे.[2] गुप्त-सम्राट् समुद्रगुप्तानें या राजांचा उच्छेद केल्यावर या संवताचा मध्यहिंदुस्थानांतहि लोप झाला. त्यानंतर माळवा व काठेवाड या प्रांतांत राज्यें करणाऱ्या क्षत्रपांच्या कोरीव लेखांत व नाण्यांवर या संवताचीं वर्षें दिलीं आहेत. हीं वर्षें शक संवताचीं होत याविषयीं विद्वानांचें ऐकमत्य आहे. कांहींच्या मतें तर या क्षत्रपांचा मूळपुरुष चष्टन हाच या संवताचा उत्पादक असावा. पण हें मत योग्य दिसत नाहीं. कारण चष्टन किती झालें तरी 'महाक्षत्रप' म्हणजे प्रांताधिपति होता; तेव्हां तो कोणत्या तरी सम्राटाचें स्वामित्व कबूल करीत होता यांत संशय नाहीं. त्याला स्वतःचा संवत् चालू करण्याचें स्वातंत्र्य नव्हतें. बहुधा त्याचा सम्राट् कनिष्कच असावा व म्हणून कनिष्कानें स्थापिलेला संवत् त्याचा प्रांताधिपति चष्टन याच्या व त्याच्या वंशजांच्या लेखांत उल्लेखिला आहे, हें मतच सयुक्तिक दिसतें. क्षत्रपांचा उच्छेद द्वितीय चंद्रगुप्त विक्रमादित्यानें इ. स. च्या चौथ्या शतकाच्या अखेरीस केला. त्यानंतर शक संवताचें उत्तर हिंदुस्थानांतून पूर्णपणें उच्चाटन झालें व त्याची जागा प्रथम गुप्तसंवत् व नंतर विक्रमसंवत् यांनीं बळकाविली.

दक्षिणेंत मात्र या शकसंवतानें आपले पाय हळूंहळूं पसरले. भूमक व नहपान या दोन परकी क्षत्रपांचें राज्य उत्तर महाराष्ट्रावर कांहीं काळ होतें. नहपानाच्या लेखांतील ४२ ते ४६ हीं वर्षें या शकसंवताचींच असावीं. या नहपानाचे लेख नाशिक, कार्लें वगैरे ठिकाणीं सांपडले आहेत. सातवाहनवंशी गौतमीपुत्रानें या नहपानाचा पराभव केला व त्याच्या क्षहरातवंशाचा समूळ उच्छेद केला. त्यानंतर इ. स. च्या दुसऱ्या शतकांत हा शकसंवत् कांहीं काळ महाराष्ट्रांतून लुप्त झाला व त्याची जागा आभीरांनीं सुमारें इ. स. २५० मध्यें स्थापलेल्या एका दुसऱ्याच संवतानें घेतली. आभीरांच्या साम्राज्यविस्ताराबरोबर त्यांच्या संवताचा प्रसार उत्तर महाराष्ट्र, कोंकण व गुजरात या प्रांतांत झाला. पुढें कलचुरी राजांनीं याचा पुरस्कार केल्यामुळें तो विदर्भांतहि कांहीं काळ प्रचलित झाला. इ. स.च्या सातव्या शतकांत बदामीच्या चालुक्यांनीं कलचुरींचा पराभव केल्यावर या आभीर किंवा कलचुरी संवताचें दक्षिणेंतून हळूंहळूं कायमचें उच्चाटन झालें.

यानंतर बदामीच्या चालुक्यांनीं शकसंवताचा पुरस्कार केला. मागें सांगितल्याप्रमाणें इ. स. च्या दुसऱ्या शतकांत हा संवत् उत्तर महाराष्ट्रांतून लुप्त झाला. यानंतरचें या संवताचें पहिलें ज्ञात वर्ष ४६५ (इ. स. ५४३) हें चालुक्य-सम्राट् पहिला पुलकेशी याच्या बदामी येथील लेखांत आढळतें. चालुक्यांचें साम्राज्य इ. स. च्या सातव्या शतकांत महाराष्ट्र, कोंकण, गुजराथ, विदर्भ व आंध्र या प्रांतांवर पसरलें. त्याबरोबर शकसंवताचा प्रसारहि हळूंहळूं या प्रांतांत झाला. तेव्हांपासून आजपर्यंत हा संवत् या प्रांतांत अविच्छिन्नपणें प्रचलित आहे.

इ. स. च्या दुसऱ्या शतकापासून सहाव्या शतकापर्यंतच्या काळांतले मात्र या संवताचे लेख अद्यापि सांपडले नाहींत. या काळांत या संवताचा उपयोग कोण करीत होते हा प्रश्न अद्यापि अनिर्णीत आहे. त्याविषयीं थोडी नवीन माहिती प्रस्तुत लेखांत देण्याचा प्रयत्न केला आहे.

इ. स. च्या सहाव्या शतकापासून बदामीच्या चालुक्यांनीं या संवताचा पुरस्कार केला खरा. पण याला ते आपला संवत् मानीत नव्हते; तर तो शकांचा किंवा शकराजांचा संवत् होता असा स्पष्ट निर्देश त्यांच्या, त्याचप्रमाणें त्यांच्या मांडलिकांच्याहि, सर्व लेखांत आढळतो. तेव्हां चालुक्यांच्या उदयापूर्वी हा संवत् कोणा शकराजांनीं उपयोजिला असून आपल्या प्रांतांत तो पूर्वीपासून प्रचलित असल्यामुळेंच चालुक्यांनीं त्याचा पुरस्कार केला, हें उघड

२ 'एपिग्राफिया इंडिका', पु. २५, पृ. २९७








आहे. चालुक्यांचे मांडलिक उत्तर महाराष्ट्र, कोंकण व गुजराथ येथें राज्य करूं लागले, तेव्हां प्रथम कांहीं काळ त्या प्रांतांत पूर्वी प्रचलित असलेल्या आभीर-कलचुरि संवताचा त्यांनीं उपयोग केला, यावरूनहि वरील अनुमान युक्त दिसेल.

पण बदामीच्या किंवा विजापूर जिल्ह्याच्या जवळपास शक राजांचा अंमल चालुक्यांच्या उदयापूर्वी होता याला कांहीं पुरावा आहे काय, असा प्रश्न येथें उपस्थित होतो. या प्रश्नाचें उत्तर अलीकडे हैदराबाद संस्थानांत सांपडलेल्या चार नाण्यांवरून देतां येतें. यांपैकीं पहिलीं दोन नाणीं हैदराबादचे नाणकसंग्राहक श्री. हुरमुज कौस यांच्या संग्रहांतील आहेत. तीं तीन वर्षांपूर्वी प्रस्तुत लेखकानें 'इण्डियन हिस्टॉरिकल क्वार्टर्ली' (पु. २२, पृ. ३४ इ.) ह्या सुप्रसिद्ध संशोधन-त्रैमासिकांत प्रसिद्ध केलीं. हीं नाणीं[३] सातवाहनांच्या नाण्यांसारखीं आहेत. त्यांवर पुढच्या बाजूस सोंड वर केलेला हत्ती असून मागील बाजूस उज्जैनी चिह्न (एकावर एक आडवे-उभे ठेवलेले डंबेल्स्) आहे. हत्तीच्या सभोंवार राजनाम आहे. कोणत्याहि एका नाण्यावर हें पूर्णपणें दिसत नाहीं पण दोन्ही नाण्यांवरचीं अक्षरें एकत्रित केलीं असतां तें ' रंजो सिरि सगमानमहसस ' असें पूर्ण करतां येतें. हें नाम तत्कालीन प्राकृत भाषेंत असून अक्षरांची लिपि इ. स. च्या दुसऱ्या–तिसऱ्या शतकांतील आहे. नाण्यांवरच्या शब्दांचा अर्थ, ' हें नाणें राजा श्री शकमानमहिष याचें ', असा होतो. पुराणांत या राजाचें नांव खालील ओळींत आलें आहे : 'शक्यमानाभवद्राजा महिषीणां महीपतिः।[४] ' पुराणांच्या पाठांत अनेक लेखकांच्या अनवधानामुळें किंवा अज्ञानामुळें पुष्कळ चुका झालेल्या आढळतात. वरील ओळींचा मूळचा पाठ ' शकमानोऽभवद्राजा महिषाणां महीपतिः ' असा असावा. त्याचा अर्थ 'महिषांचा राजा शक मान होऊन गेला ' असा आहे. तेव्हां हीं नाणीं शकवंशी मान राजाचीं होतीं, असें स्पष्ट दिसतें. त्याला पुराणांत 'महिषांचा राजा' म्हटलें आहे. या नाण्यांवरहि त्याला ' महिष ' असें विशेषण लावलें आहे. त्यावरून तो माहिषक देशावर राज्य करीत होता असें दिसतें. या माहिषक देशाचा उल्लेख दक्षिणेंतील विदर्भ व ऋषीक (सध्यांचा खानदेश) या देशाबरोबर रामायणांत केला आहे. त्याविषयीं विवेचन पुढें करूं.

गतवर्षी (मे १९४९ मध्यें) हैदराबाद संस्थानाच्या पुराणवस्तु-संशोधन-खात्याचे डायरेक्टर श्री. ख्वाजा मुहम्मद अहमद यांनीं कांहीं नाण्याचे फोटो वाचनार्थ मजकडे पाठविले. त्यांपैकीं दोन नाणीं या वंशांतील राजांचीं आहेत.[५] यांपैकीं एक नाणें हैदराबाद शहराच्या उत्तरेस मेडक जिल्ह्यांतील कोंडापूर येथें सांपडलें होतें. या ठिकाणीं सातवाहन राजांच्या काळचे विस्तृत अवशेष सांपडले आहेत. हें नाणें शिशाचें असून त्याच्या पुढील भागावर सिंहाची आकृति आहे. हेंहि नाणें सातवाहनांच्या

३

नाणें १


पुढील बाजू


मागील बाजू

नाणें २


पुढील बाजू

४ पार्जिटरकृत ' कलियुगांतील राजवंश ' (इंग्रजी), पृ. ५१.

५ ' जर्नल ऑफ् दि न्यूमिस्मॅटिक सोसायटी ऑफ इंडिया ', पु. ११, पृ. १

नाण्यांसारखें आहे. या नाण्यावरचें राजनाम खंडित आहे. तथापि ' माण महसस ' अशीं अक्षरें वाचतां येतात. त्यावरून हें नाणेंहि त्याच शकवंशी मान राजानें पाडलें होतें यांत संशय नाहीं.

दुसरें नाणें हैदराबाद संस्थानच्या दक्षिणेंतील रायचुर जिल्ह्यांतील मस्की येथें उत्खननांत सांपडलें. येथें अशोकाचा शिलालेख सांपडला असल्यानें हें गांव संशोधकांस सुपरिचित आहे. हेंहि नाणें शिशाचें असून त्याच्या पुढील भागावर घोड्याची आकृति आहे. त्याच्या सभोंवारचें राजनाम खंडित आहे. तथापि 'यसस महासस ' अशीं अक्षरें वाचतां येतात. त्यावरून हें नाणें महिष वंशांतीलच एका राजानें पाडलें असून त्याच्या नांवाच्या शेवटीं ' यशस् ' असा शब्द होता असें दिसतें. या राजाचीं आणखीं नाणीं सांपडल्याशिवाय हें राजनाम पूर्ण करणें शक्य नाहीं.[६]

महिष हें वंशनाम माहिषक या देशनामावरून पडलें असावें. या माहिषक देशाचा उल्लेख रामायण, महाभारत व पुराणें यांत अनेक ठिकाणीं येतो. रामायणामध्यें सीतेच्या शोधाकरितां सुग्रीवानें भिन्न भिन्न दिशांस वानर पाठविल्याचें वर्णन आहे. दक्षिणच्या देशांमध्यें ' विदर्भान् ऋषिकांश्चैव रम्यान् माहिषकानपि ' असें विदर्भ व ऋषिक ( खानदेश ) देशाबरोबर माहिषक देशाचें नांव आलें आहे. महाभारतांत तर माहिषकाचें नांव भीष्मपर्व, कर्णपर्व, आनुशासनिकपर्व, आश्वमेधिकपर्व इत्यादि अनेक पर्वांत आढळतें.[७] त्यावरून माहिषक देश द्रविड, कलिंग, आन्ध्र व महाराष्ट्र या देशांप्रमाणेच दक्षिणेंत होता असें दिसतें; किंबहुना या देशांबरोबर त्याचें नांव आल्यानें त्या देशांजवळच तो असावा असेंहि अनुमान करतां येतें. मागें वर्णिलेलीं नाणीं हैदराबाद संस्थानच्या दक्षिण भागांत सांपडलीं असल्यानें त्या भागाचें प्राचीन नांव माहिषक होतें असें अनुमान केल्यास तें बहुधा चूक होणार नाहीं.

मागें वर्णिलेल्या नाण्यांवरून मान राजा या प्रदेशावर राज्य करीत होता असें दिसतें. पुराणांत ज्या ऐतिहासिक काळांतील थोड्या राजांचा नाम-निर्देश आहे त्यांपैकीं तो एक आहे. त्यावरून तो बराच बलाढ्य असावा व त्याचें राज्यही बरेंच विस्तृत असावें. या भागांत त्याच्या वंशजांचें राज्य कित्येक पिढ्या चाललें होतें. पुराणांत म्हटलें आहे आहे कीं, आंध्र किंवा सातवाहन वंशाचा अस्त झाल्यावर अनेक राज्यें उदयास आलीं. त्यांपैकीं एक शकराज्य होतें. हे शक राजे अठरा असून त्यांनीं ३८० वर्षें राज्यें राज्य केलें. पुराणें सांगतात. या वर्षांच्या संख्येंत चूक असावी व खरी संख्या १८३ वर्षें असावी असें पार्जिटरसाहेबाचें म्हणणें आहे.[८] तें खरें असल्यास या अठरा शक राजांनीं सुमारें इ. स. २५० ते ४३३ या काळांत राज्य केलें असावें.

या दक्षिणेंतील शक राजांचे कोरीव लेख अद्यापि सांपडले नाहींत. तथापि, वनवासीच्या कदंबनृपतींचा मूळ पुरुष मयूरशर्मा यानें शकस्थान नामक प्रदेश जिंकला असल्याचें म्हैसूर संस्थानां-तील चन्द्रवल्ली येथील प्रस्तरलेखांत म्हटलें आहे. हें शकस्थान कदंबांच्या राज्यापासून फार दूर नसून दक्षिणेंतच असावें. कदंबांचें राज्य धारवाड जिल्ह्याच्या दक्षिणेस उत्तर कानडा प्रांतावर होतें. तेव्हां त्यांनीं जिंकलेलें शकस्थान माहिषकच असावें असें अनुमान करण्यास हरकत नाहीं.

या शकराजांनीं आपला संवत् माहिषक देशांत व त्या सभोंवारच्या आपल्या राज्यांतील इतर भागांत प्रचलित केला होता असें दिसतें; तेव्हां हा संवत् विजापूर, बेळगांव, धारवाड या जिल्ह्यांत

---

६ या वंशांतील राजांच्या आणखी कांहीं नाण्यांचे फोटो नुकतेच माझ्या हातीं आले आहेत. तेहि लवकरच प्रसिद्ध होतील.

७ ' ज. न्यू. सो. ऑ. इं. ' पु. ११, पृ. ४.

८ पार्जिटरकृत ' कलियुगांतील राजवंश ', प्रस्तावना, पृ. २४.

अनुक्रमणिका







प्रचलित असावा. या कर्णाटक जिल्ह्यांतील चालुक्य-पूर्वकालीन कोरीव लेख सांपडल्यास त्यांत या संवताचा उल्लेख आढळेल अशी अपेक्षा आहे.

इ. स. च्या सहाव्या शतकांत बदामीच्या चालुक्यांचा उदय झाला. त्यांनीं आपल्या लेखांत या संवताचा उपयोग केला आहे याचें कारण त्यांच्या देशांत तो पूर्वींपासून चालू होता हें होय. राज्यक्रांति झाली तरी लोकांच्या अंगवळणीं पडलेली कालगणनापद्धति एकदम बदलत नाहीं. आभीर, कलचुरि, गुप्त, हर्ष यांचे संवत् त्यांचें साम्राज्य नष्ट झाल्यावरहि कित्येक शतकें चालू होते याचें कारणहि हेंच आहे. इंग्रजांचें राज्य गेल्यावरही आपण त्यांच्या खिस्ती शकाचा उपयोग करीत आहोंच. असो.

चालुक्यांनीं शकसंवताचा उपयोग केला असला तरी त्यांनीं तो संवत् आपला नसून शकांचा किंवा शकराजांचा होता असा स्पष्ट निर्देश आपल्या सर्व लेखांत केला आहे. चालुक्यांचें साम्राज्य द्वितीय पुलकेशीच्या कारकीर्दींत महाराष्ट्र, कोंकण, विदर्भ गुजराथ, आंध्र या प्रांतांवर पसरलें. यांपैकीं पहिल्या चार प्रांतांत त्याकाळीं आभीर किंवा कलचुरी संवताचा प्रचार होता. चालुक्यवंशी राजांनीं किंवा किंवा त्यांच्या मांडलिकांनीं आपल्या आरंभींच्या लेखांत त्याच संवताचा उपयोग केला आहे. पण पुढें हळूहळू ते स्वतःला जास्त परिचित असलेल्या शक-संवताचा उपयोग करूं लागले. शंभर-दीडशें वर्षां-च्या अवधींत या प्रांतांतून कलचुरी शकाचें पूर्णपणें उच्चाटन झालें. पूर्वेस आंध्र प्रांतांत त्याचा प्रसार आरंभापासून झाला होताच. आंध्र देशाच्या उत्तरेस कलिंग देशांत गांगसंवत् चालू होता. तो इ. स.च्या दहाव्या शतकापर्यंत टिकला. अकराव्या शतकांत तेथेंही शकसंवतानें आपला प्रवेश केला. पुढें इ. स.च्या तेराव्या शतकांत देवगिरीच्या यादव राजांच्या मांडलिकांच्या एका लेखांत प्रथमच त्याला शालि-वाहन शक असें नांव मिळालें व त्याचा शालि-वाहन या पुरातन राजाच्या नांवांशीं संबंध जोडला गेला. तेव्हांपासून आपण त्यास शालिवाहन शक म्हणत आहों.

सध्यां महाराष्ट्रांत प्रचलित असलेल्या शालि-वाहन शकाची पूर्वपीठिका ही अशी आहे.

---

## थोरो आणि सविनय कायदेभंग [ पान ११ वरून पुढें चालू ]

राहणें हें लाजिरवाणें आहे. त्याला विरोध करणें हें सोपें व सरळ आहे. सहा वर्षें झालीं मीं कर दिला नाहीं. त्यामुळें एकदां एका रात्रीपुरतें मला तुरुंगांत डांबून ठेवलें होतें. जेव्हां त्या कैदखान्याच्या भिंती व त्याचे लोखंडी दरवाजे शाबूत आहेत कीं नाहींत तें तपासण्यांत आलें, तेव्हां मला राज्याच्या मूर्खपणाची कल्पना आली. कारण मला कैद कर-णारे तरी असेंच मानीत असले पाहिजेत कीं, मी केवळ हाडें व मांस यांचाच बनलेला आहे. ते मूर्ख समजूं शकत नाहींत कीं, मी भिंतींनीं घेरलेला असलों तरी इतरांपेक्षां अधिक मोकळा आहे. मी कैदेंत होतों असें मला वाटलें नाहीं. मला तरी असेंच वाटलें कीं, जे कैदेच्या बाहेर होते तेच कैद्यांच्या अवस्थेंत होते. मला ते ताब्यांत आणूं शकले नाहींत, म्हणूनच त्यांनीं माझ्या देहाला सजा केली. तसें झाल्यामुळें मी अधिक मोकळा झालें. आणि माझे विचार राज्याबाबत अधिक भयंकर बनले. मी असें पाहिलें आहे कीं, पोरें कोणा माणसाचें कांहीं करूं शकलीं नाहींत तर त्याच्या कुत्र्याला तीं त्रास देतात. तसेंच राज्यहि मला कांहीं करूं शकलें नाहीं म्हणजे माझ्या शरीराला इजा करतें. आणखी मी असेंहि पाहिलें आहे कीं, शरीराला हात लावावयालाहि राज्य डरत होतें. त्यामुळें मला जो कांहीं राज्याबद्दल मान वाटत असे तोहि गेला. ''

---








श्रीभारतीय. अनु. : श्री. मनोहर देखणे

# विलक्षण चोर !

संध्याकाळपासून[1] चर्चा चालली होती. त्याचबरोबर माझें धूम्रपानहि चालूं होतें. प्रोफेसरसाहेबांचें म्हणणें होतें कीं, ' समाजांत संपत्तीची जी धारणा आहे ती सभ्यतेचा एक अस्वाभाविक आधार आहे. आणि ती एखाद्या दिवशीं समाजास अधोगतीस नेईल. आणि माझें मत होतें कीं, ' संपत्तीचें उगमस्थान हें प्राणिमात्रांच्या प्रयत्नांच्या प्रेरणेंत आहे. कुणाला कांहीं स्वार्थ नसेल तर त्यास कांहीं कार्य करण्याची इच्छाच असणार नाहीं ! '

आपापल्या समर्थनार्थ आम्ही दोघे तर्क नि पुरावे यांच्या आधारें मुद्दे मांडीत होतों. मला गप्प बसविण्यासाठीं प्रोफेसरमजकूर आपल्या विद्येचा अन् त्याआधारें साऱ्या ग्रंथभांडाराचा उल्लेख वारंवार करीत होते. वादांतला थकवा घालवावा म्हणून चहा नि धूम्रपानहि चालूं होतें आमचें. तों मधेंच नोकरानें येऊन सांगितलं, " मिस्टर यादवराव आलेत. "

मि. यादराव बेधडक आंत घुसले व सरळ स्प्रिंगच्या खुर्चीवर जाऊन बसले. सिगारेट पुढें करीत मीं प्रोफेसरांची ओळख करून दिली. त्या दोघांनीं स्मित हास्य केलें, कारण ते आधींपासूनच चांगले परिचित होते. आतां तर गप्पांना अधिकच रंग भरला. यादवराव सिगारेटचा एक झुरका घेत म्हणाले, " हें सारं सिद्धान्ती लोकांचं मनोरंजन झालं. पण मी आतां तुम्हांला माझ्या जीवनांतला एक विलक्षण अनुभव सांगतों. "

मूळ विषय बाजूला राहिला व आम्ही दोघें आतुरतेनें त्यांचा तो अनुभव ऐकूं लागलों. ते सांगूं लागले—

"...मि. गंधे, त्या दिवशीं तुम्ही मजकडून रात्रीं १० ला उठून गेलांत त्याच दिवशींची घटना ! माझीं पोरं नि नोकर तर तुमच्याच समोर, मला वाटतं, स्टेशनवर निघून गेलीं होतीं ! त्याच रात्रीं तुम्हीं गेल्यावर माझ्या घरांत एक चोर घुसला. विलक्षण चोर ! ज्याची गोष्ट तुम्हांला थक्क करील."

आम्ही जास्तच उत्कंठेनें ऐकूं लागलों. यादवराव सिगारेटची राख झाडीत म्हणाले, " प्रोफेसरसाहेब, त्या रात्रीं १२ च्या सुमारास मी गादीवर पडलों. वाचन करीत झोंपायची मला संवय आहे. त्या दिवशींहि तसंच झालं. मुलं गेल्यावर घरांतलं सामान अस्ताव्यस्त पडलं होतं तें तसंच पडूं दिलं व बाहेरचे नि आंतले दरवाजे लावून घेऊन, शाल पांघरून मी पडलों. एकटेपणामुळं डोळा लवकर लागेना. नाहीं तर तुम्हांला ठाऊकच आहे, मि. गंधे, कसा आडवातिडवा मी झोंपतों तें !

"दोनच्या सुमारास मला कुठं तरी खाट्-खुट् असा आवाज आल्यासारखं वाटलं. वाटलं कीं, बाथरूमचं बाहेरचं दारच उघडलं जातंय. पडल्या पडल्या मीं तिकडे दृष्टि फेंकली. दारावाटें येणारीं चंद्राचीं किरणं नाचूं लागलीं. जणुं त्यामागं कोणाची तरी छाया हालत असावी. सावधानतेनं तिकडे बघत मी तसाच

---

१ प्रस्तुत कथा ही श्रीभारतीय यांच्या ' विचित्र अनुभव ' या कथासंग्रहांतील एका कथेचा अनुवाद आहे. श्रीभारतीय ऊर्फ श्री. सत्यजीवन वर्मा, एम्. ए. हे हिन्दींतील नामवंत लेखक असून त्यांनीं ' सोला कहानियाँ ', ' खलिफा ' इत्यादि पुस्तकें लिहिलीं आहेत. ——अनुवादक



अनुक्रमणिका

पडलों. तेंच करणं मला उचित वाटलं. थोड्याच वेळांत फुटक्या कांचेरी तावदानास लावलेल्या कागदावाटें एक हाताचा पंजा दृग्गोचर झाला. कुणा तरी इसमाचाच पंजा होता तो! त्या अंधुक प्रकाशांतहि माझी नजर त्या वैशिष्ट्यपूर्ण पंजावर खिळली. त्याचीं बोटं लांब व सुकुमार वाटलीं.

" मी तें पहातच होतों. त्या पंजानं वरच्या बाजूचे बोलट चांचपण्यास सुरुवात केली. मी तसाच पडून होतों. बघतां बघतां बाथरूमचं दार तर उघडं पडलं. उघडतांच चंद्राच्या अंधुक उजेडांत मला माणसाची एक उंच पडछाया आंत आल्याचं दिसलं. मला वाटलं, बेडस्विच दाबून उजेड करावा. पण माझा तो विचार कृतींत येण्यापूर्वींच बाथरूमचा दिवा उजळला गेला व मला एक पाठमोरी मानवी आकृति दिसली. त्या आकृतीवरून ती व्यक्ति उंचीपुरी पण अशक्त नि किडकिडित वाटली. तिच्या कपड्यावरनं तो चोर वाटणं केवळ अशक्य होतं!

" मनांत आलं, खांकरावं. तथापि मी तसाच डोक्यावर शाल घेऊन पडून राहिलों. मी त्याच्या पावलांची चाहूल घेऊं लागलों. मला ऐकूं आलं, —जणु तो बोलत होता : ' झोंपलाय तें ठीक आहे. नाहीं तर व्यर्थ एका खुनाचा अपराधी मला व्हावं लागलं असतं.' मी जरासा घाबरलोंच. तो मला माणूस ड्रेसिंग टेबलपाशीं उभा राहून बोलत होता, ' मीहि एखाद्या सज्जन माणसासारखा नाहीं वाटत? मला सुद्धां जर सुखांत राहवंसं वाटत असेल तर, त्या सभ्य लोकांपेक्षां मी का कमी सभ्य समजलों जावा? परंतु इथें तर बेकारी—नि—दुष्काळानं आमचं पेकाट मोडलंय्! आम्ही केवळ समाजाच्या आर्थिक दुर्व्यवस्थेचे भागीदार बनलों आहों!'

" त्यानं ड्रॉअर उघडला. आडदांडपणानंच! माझं घड्याळ मनगटावर बांधीत तो म्हणाला, ' हें माझ्या उपयोगाचंच आहे. अजून तीनला अर्धा तास आहे तोंवर सारं आटोपेल.' मला भास झाला, बत्ती विझवून तो माझ्याच खोलींत आला आहे! क्षणभर माझं हृदय थरकलं. तथापि मी तसाच पडलों.

" एका खुर्चीला लागून पडतां पडतां तो बचावला. त्याच्या त्या दुरवस्थेमुळें माझ्या हाताला त्याची दया आली. त्याच्या लक्षांत येण्याआधीं खोलींतला दीप उजळला गेला. खोलींत प्रकाश भरला नि माझ्या मनांत साशंकता. पण माझ्या कानानं, त्यानं स्पष्टपणं उच्चारल्याचं ऐकलं. 'थँक्स्!' तो खोलीची शोधाशोध करूं लागला. त्याच्या निश्चितपणानं माझं भय कमी होत गेलं; उलट, ती जागा कुतूहलानं घेतली."

प्रोफेसरसाहेबांच्या तोंडून एकदम उद्गार आले, " विचित्र चोर होता मोठा! मला तर तो फारच विचित्र वाटतो!!"

यादवरावांनीं आपलें बोलणें पुढें चालूं केलें :

" तुम्ही आपली उत्सुकता आवरून धरा. —मग तो सद्गृहस्थ माझे कपडे शोधूं लागला. स्वतःचा ओव्हरकोट काढून त्यानं माझा परिधान केला. अन् म्हणूं लागला, ' अगदीं नवा दिसतोय! कोण म्हणेल, मला हा शोभत नाहीं? फाटका ओव्हरकोट घालतों म्हणूनच लोकांना मी गरीब वाटतो. नवा ओव्हरकोट काय मी घालूंच नये?' —— एकेक करून माझ्या साऱ्या वस्तूंचा शोध त्यानें घेतला. जी आवडली ती अंगावर चढवली. माझा ओव्हरकोट, सूट, हॅट, माझं घड्याळ, फौंटनपेन, बूट, जें आवडेलं तें घेतलं. अशा प्रकारें तो सजून आरशापुढं उभा राहिला व म्हणाला, ' आतां पहा मला! कोणत्याहि सभ्य माणसापेक्षां मी कमी सभ्य दिसतों होय? — वा:! किती दिवसांनंतर मला हें भाग्य प्राप्त झालं आज. पण काय एवढ्यावरच काम भागेल? थोडेसे बदलायला इतर कपडेहि हवेत. जीवनांतल्या आवश्यक किमान गरजा देखील जर भागत नसतील तर—मानवाचं या जगांत प्रयोजन तरी काय? काय आम्हांस एवढासुद्धां हक्क नाहीं कीं, आयुष्यांतल्या किमान गरजा तरी पूर्णपणें निभावल्या जाव्या आमच्या? हं:! हा समाज!— याचा खून करणं काय गुन्हा आहे?'

" मला असं वाटलं कीं, स्वारी भडकली असावी. कारण त्याच्या एका मुष्टिप्रहारानं ड्रेसिंग टेबल हादरलं गेलं. पुन्हां शांतपणें तो बडबडूं लागला : ' तरी बरं, या गृहस्थानं डाराढूर झोंपून मला पिशाच्च होण्यापासून सांवरलं. नाहीं तर नाहक माझ्याच








जातींतल्या एका प्राण्याची हत्या माझ्याकडून घडती !—जरी तसं करणं अन्यायाचं नव्हतं तरी. '

" आतां तो एक एक करून आपल्या आवडी-च्या जिनसा बांधूं लागला. मी पडल्या पडल्या ऐकत होतों. त्यानं उपयुक्त वस्तू प्रथम बांधल्या व बोलला, ' ही अल्मारीहि हुडकायला हवी. कदाचित् तिच्यांतहि माझ्या उपयोग्य वस्तू असतील ! ' अल्मारीस मोठं कुलूप होतं. तें तोडणं कठिण होतं. किल्ल्यांचा जुडगा माझ्या उशाखालीं होता. मी तो हलकेंच पलंगाखालीं टाकला. त्यानं पहिल्यांदा कुलूप तोडायची कोशीस केली. परंतु जेव्हां ते जमेना तेव्हां तो चाव्या शोधूं लागला. अखेर त्यास त्या सांपडल्या. अल्मारी उघडल्याचा ध्वनि माझ्या कानीं पडला. अल्मारींतहि माझे कपडे होते. एका कोपऱ्यांतल्या पाकिटांत थोडेसे पैसेहि होते. तो आपल्याशींच पुटपुटत काम उरकीत होता. मी त्याची स्वगतभाषा ऐकतच होतों. तो म्हणत होता : ' हे दोन सदरे पुरे झाले. दोन गंजिफ्रॉक पाहिजेतच. पायजमे दोन बस्स होतील. एका सुटावर हिंवाळा सहज जाईल. एखादा टॉवेल, २–४ रुमाल हवेतच. बस्स ! एकूण या पिशवींत जेवढं आहे, तेवढं पुरेसं होईल. पण हें सारं ठेवा-यला एखादी पेटीहि हवीच ! अन् ही सूटकेस तरी रिकामीच पडली आहे. तीच घ्यावी ! ' अशा रीतीनं त्यानं सारी सूटकेस भरून तयार केली. ती घेऊन तो दुसऱ्या दालनांत गेला. तिथला विद्यु-द्दीप लावला. मीं माझ्या खोलींतला दिवा मालवला. आतां तोंडावरची शाल दूर करून मी पाहूं लागलों. महाशय नजीकच्या खोलीची तपासणी करीत होते. तुम्ही तर पाहिली आहे ती खोली, मि. गंधे ! ज्यांत माझीं मुलं व पत्नी राहतात. हो तीच ! "

आम्ही इतक्या एकाग्रतेनं ऐकत होतों कीं, हुंकार भरायची देखील आम्हां दोघांना शुद्ध नव्हती.

मि. यादवराव पुढें सांगूं लागले : " मी माझ्या अंधेऱ्या खोलींतून पहात होतों. माझे अतिथि आता मंचकारूढ झाले असून माझ्या सौ० चे व मुलांचे कपडे शोधीत होते. मी त्यांचं स्वगत कान देऊन ऐकूं लागलों—' हें पातळ काय माझी पत्नी नेसूं शकत नाहीं ? आणि हीं वस्त्रं घालून माझीं पोरं खूप नाहीं होणार ! ' मग त्यानं त्यांतील हवे ते कपडे घेतले. तितक्यांत घड्याळांत तीनचे टोल निनादले. व तो जणुं भानावर आला, त्यानं घाई केली. सूटकेस व कपडयांचं गाठोडं घेऊन तो व्हरांड्यांत गेला.

" तिथं त्याला एका अल्मारीवर पेयांचीं कांचपात्रं दिसलीं. त्यानं त्यांतलींहि कांहीं निवडलीं. त्यांतलीं आवडलीं तीं एकीकडे ठेवली. हळूंहळूं साऱ्या घराची तपासणी करून एका संसारापुरतं सामान जमा केलं. गाठोडं खूप जड झालं होतं. तो बोललाः ' हरकत नाहीं. ही सूटकेस तर मी नेऊं शकतों. आधीं ही पोंचवून मग नेईन दुसरं सामान.' असं म्हणून आंगणांतलं दार तो उघडूं लागला. पण वाऱ्याच्या एका गार झोतासरशी त्याला सिगा-रेटची आठवण आली. अन् त्याचे उद्गार कानीं आले, ' सिगारेट तर होती माझ्या खिशांत ! ' मग त्याच्या ध्यानीं आलं कीं, आपला ओव्हर-कोट तर बदलला, आतां त्यांतल्या सिगारेटसाठीं पुन्हां खोलींत जाणं ठीक होणार नाहीं.

" आतां मात्र माझ्यानं राहावेना. मला वाटलं बिचारा सिगारेटपायीं अस्वस्थ होणार. मी हळूंच अंथरुणांतून उठलों. अंधारांतच ओव्हरकोट चांचपला. तो अंगांत घातला. वजनावरून तो माझा नाहीं हें ओळखलं. नशीब, त्या पठ्ठयानं माझ्या कोटाच्या जागींच आपला ओव्हरकोट ठेवला होता !

" मी खोलींतून निघेतों तो चालूं लागला होता. व्हरांड्यांत जडसं गाठोडं पडलं होतं. अंगणाकडील दरवाजा सताड मोकळा झाला होता. मी पुढं सरकून पाहिलं दूर अंतरावर एक उंच कृष्णछाया हलके हलके अंधकारांतर विलीन होत होती. मी चद्दिर्शी तें बोचकं शिरावर ठेवून क्षीण चंद्रप्रकाशांत,त्या छायेमागोमाग निघालों. कडाक्याची थंडी. वाराहि सोसाट सुटलेला...मी तसाच चालूं लागलों. दूरवर तो गडी डोक्यावर सूटकेस ठेवून झुकत झुकत मार्ग काढीत होता. आम्ही गांवाबाहेर आलों. प्रशान्त अशा त्या रस्त्यावर, वृक्षांच्या घन-दाट छायेंत मी केवळ त्याच्या पावलटीवर चाललों








होतों. अल्पावधींतच त्याची पावलट नजीक येऊं लागली. मी त्वरेनं पुढं चाललों. मी त्याच्यापाशीं जाण्यापूर्वीं तो थकून बसला होता. थोड्या अंतरावर बसून मी त्याची हालचाल निरखूं लागलों.

" थंडीमुळं हातावर हात चोळीत त्यानं म्हटल्याचं कानीं आलं–' काय चूक केली ! सिगारेटच विसरून आलों. ' मलाहि आठवण झाली. खिशांत हात घातला तर तिथं सिगारेट-केस व काड्याची पेटी हातास लागली. त्यांतली एक शिलगावून मी ओंठांत ठेवली, व बसूनच विचारलं, ' काय मिस्टर, आपण सिगारेट ओढतां ? ' ' थॅंक्स ' म्हणून त्यानं हात पुढं केला. व मी त्यास सिगारेटची डबी व मॅच-बॉक्स दिली.

" मीं विचारलं, ' अजून किती दूर जायचं आहे ? ' तो उत्तरला, ' मला तर अद्याप खूप अंतर चालून जायचंय. पण तुम्ही कोठवर जाणार ? ' मीं उद्गारलों, ' जिथवर तुम्ही जाणार––! ' तो जरासा दचकूनच म्हणाला, ' तुमचा आशय नाहीं कळला ! ' मीं सांगितलं, ' मी तर तुमच्याचबरोबर आहे. आपलं हें सामान पोंचवायाला निघालोंय. '

" ' कोणतं सामान ? ' असं म्हणत असतांच त्याची नजर त्या बोचक्यावर गेली. मी म्हटलं, ' हें जें गाठोडं तुम्ही बरोबर आणूं शकलां नाहींत तेंच पोंचवयाला मी निघालों आहे. ' तो घाबरून खडबडून उडला. मी त्याचा हात धरून आग्रहानं म्हणालों, ' माझ्याबद्दल संशय बाळगूं नका. चला, मी हें आपल्याला हव्या त्या स्थळीं ठेवून येतों. ' त्याचं मस्तक विनम्र झालं. मीं शिरावर तें गाठोडं घेतलं नि हातांत सूटकेस घेऊन म्हणालों, ' उशीर नका करूं. थोडा वेळच रस्ता चालावा लागेल. तुम्ही व्हा पुढं. ' त्याला प्रेमानं पुढं ढकलीत मी निघालों. पण एखाद्या पुतळ्यासारखा तो निश्चलपणें त्या जागीं उभा राहिला. क्षणभरानं त्यानं माझ्या शिरावरचं ओझं आपल्या डोक्यावर घेतलं व सूटकेसहि घेतली माझ्या हातून, अन् चालत असतांच तो म्हणाला, ' रावसाहेब, आपल्याला त्रास होईल पण उचलाच झरझर पाऊल. '

" मी पाहिलं तो थेट गांवाकडेच निघाला होता. मी मंत्रमुग्ध झाल्यागत त्याच्यामागून निघालों. मी त्याच्याशीं बोलायचा यत्न केला कीं चालतां चालतां तो एवढंच म्हणे––' चला या तुम्ही. इथं कांहीं बोलणं उचित नव्हे. ' त्याच्या त्या द्रुतगतीनं जाऊं लागतांच आम्ही पुन्हां माझ्या घरासमोर येऊन थडकलों. पडवींत त्यानं तें गाठोडं ठेवलं; शेजारींच सूटकेस ठेवली. एक सिगारेट पेटविली आणि एक माझ्या हातीं देत तो म्हणाला, ' या वस्तू मी पुन्हां केव्हां तरी येऊन घेऊन जाईन. या वेळीं मात्र तुम्ही माफ करा– ! ' मग मोठ्या प्रेमभरानं व आदरानं त्यानं माझा हात दाबला, नि ' गुड् नाईट ' ठोकून मोठ्या चपळतेनं तो माझ्या घरांतून बाहेर गेला. "

यादवराव थांबले. प्रोफेसरांनीं व मीं एकदमच सवाल केला, " अन् तो पुन्हां आला ? "

यादवराव मोठ्या खिन्नतेनें उद्गारले, " कुठें ?– अद्याप नाहीं ! "

———












प्रा. दे. ज. हातेकर

# वर्ध्यांतील बुरूड : सामाजिक, आर्थिक निरीक्षण

बुरूड मूळचे गोंड. बुरूड आजहि आपापसांत गोंडी भाषा बोलतात. गेल्या शतकांत बुरुडांचा शहरी जीवनाशीं संबंध आला. वर्धा शहरांत बुरुडांचीं एकतीस कुटुंबें आहेत व त्यांची लोकसंख्या १३८ आहे.

बांबूपासून धान्य पाखडण्याचीं सुपें, लहानमोठीं टोपलीं, पेटारे, फळांचे करंडे, फुलाऱ्या, डाल्या, चिकाचे पडदे, सर्व प्रकारच्या चटया इत्यादि दैनंदिन जीवनाला आवश्यक वस्तू तयार करण्याचा धंदा बुरुडांनीं कित्येक वर्षांपासून जिवंत ठेवला आहे. हा गृहोद्योग टिकविण्याचा आटोकाट प्रयत्न बुरूड करीत आहेत. या गृहोद्योगाची समाजानें किती आर्थिक अवहेलना व सामाजिक उपेक्षा केली आहे, याचें नमुनेदार उदाहरण म्हणून बुरुडांचा गृहोद्योग हा सांगतां येईल.

बुरुडांच्या एकतीस कुटुंबांत पुरुष व स्त्रिया मिळून काम करणाऱ्या ८० व्यक्ती आहेत. आणि म्हातारे व लहान मुलें मिळून ५८ व्यक्ती या कुटुंबांवर अवलंबून आहेत.

पुरुष सरासरीनें रोजीं १० तास काम करतो. व स्त्री सरासरीनें ७ तास काम करते. कांहीं बुरूड १४ तासदेखील रोज काम करतात. काम करणाऱ्या ८० बुरूड मंडळींत ४२ पुरुष आहेत व ३८ स्त्रिया आहेत. एक पुरुष आठवड्यांत सरासरीनें ७० तास काम करतो. स्त्री एका आठवड्यांत ४९ तास काम करते. ही बुरूड मंडळी आपल्या वस्तू रोजच्या-रोज सायंकाळीं विकून जी रोजी मिळेल त्यांवर उदरनिर्वाह करतात.

काम करणाऱ्या ८० बुरुडांच्या रोज तयार केलेल्या वस्तूंच्या किंमतीचा हिशेब करून पाहिल्यास असें दिसतें कीं, एका बुरुडाला एकूण वर्षाच्या हिशेबानें रोज सरासरी ४ बांबू लागतात. ८० बुरूड रोज ३२० बांबू फोडून निरनिराळ्या उपयुक्त वस्तू तयार करतात. एका वर्षांत या सर्व बुरुडांना १,१५,२०० बांबू लागतात. त्यांची सरासरी किंमत सध्यांच्या हिशेबानें २८,८०० रुपये होते. वर्ध्याला व्यापाऱ्यांचीं बांबूंचीं नऊ दुकानें आहेत. त्या दुकानांतून बुरूड बांबू विकत आणतात. ८० बुरूडांच्या श्रमानें एका वर्षांत सरासरी ७२,००० रु. किंमतीचा माल तयार होतो. एका वर्षांत निर्माण झालेला एवढ्या किंमतींचा माल विस्कळितपणें एकेका बुरुडाकडून रोजच्या रोज सायंकाळीं विकला जातो. दिवसभर काम करून प्रत्येक बुरूड थकलेला असतो. संध्याकाळीं घरीं कांहींच खावयास नसतें. सूर्योदयापासून सूर्यास्तापर्यंत जेवढ्या वस्तू तयार केल्या असतील तेवढ्या विकून निर्वाहाकरतां पैसे जमवावे लागतात. कोणाहि बुरुडाचें स्वतःचें कायम दुकान नाहीं. आंगणांत उघड्या मैदानावर दिवसभर राबून वस्तु बनवावी, दिवे, लागणीच्या वेळीं बुरुडाकडे येणाऱ्या व्यापाऱ्याला तो म्हणेल त्या भावानें वस्तू विकावी, अशी स्थिति आहे. असे व्यापारी वर्ध्यांत चौघे आहेत. सायंकाळीं या चौघांनीं खरेदी केली म्हणजे बुरुडांना जेवणाला पैसे मिळूं शकतात. बुरूड आपला माल विकावयास व्यक्तिशः शहरांत फारसें हिंडत नाहींत आणि त्यांना सवडहि नाहीं. व्यापारी लोक केव्हां










अनुक्रमणिका

केव्हां माल फार पडलेल्या भावानें बुरुडापासून खरेदी करतात. केवळ बाबूंची किंमत व चार दोन आणे मजुरी पडेल एवढीच त्या वस्तूची किंमत ते देतात आणि नंतर वाढल्या भावानें शहरांतील निरनिराळ्या ग्राहकांना वस्तु विकतात. वस्तूंवरील नफा या व्यापाऱ्यांना जातो. व्यापारी नसते तर शेंकडा २५ प्रमाणांत वस्तूंच्या किंमती अधिक मिळून ८० बुरुडांची प्राप्ति एका वर्षांत सुमारें १ लाखापर्यंत गेली असती.

सध्यांच्या परिस्थितींत बांबूंची किंमत वजा जातां ८० बुरुडांची एका वर्षाची निव्वळ कमाई ४३,२०० रु. होते. या हिशेबानें ८० बुरुडांना प्रत्येकीं रोजीं सरासरी १॥ रु. मजुरी मिळते. परंतु या ८० काम करणाऱ्या बुरुडांना त्यांच्यावर अवलंबून असणाऱ्या ५८ नातेवाईकांची आर्थिक जबाबदारी असल्यानें १३८ बुरुडांची प्रत्येकी सरासरी प्राप्ति रोजीं १४ आणे पडते.

दर माणसीं रोजीं १४ आणे प्राप्ति वाईट नाहीं. तथापि या सर्व बुरुडांची सामाजिक राहणी, त्यांच्या ठिकाणीं खोल रुजलेल्या सवयी, अज्ञान, व आपल्या हिताविषयींची बेफिकिरी यामुळें या प्राप्तीचा सदुपयोग त्यांना करतां येत नाहीं. म्हणून त्यांच्या आर्थिक व सामाजिक पुनरुत्थानाचा विचार साकल्यानें झाला पाहिजे.

त्यांच्या जेवणाखाणाच्या संवयी विचारांत घेण्यासारख्या आहेत. सर्व बुरुड-कुटुंबांत प्रत्येकाच्या घरीं एकदांच–रात्रीं–स्वयंपाक होतो. सर्व बुरूड रात्रीं जेवढें व जसें जेवण मिळेल तसें एकदांच जेवतात, दिवसां चूल पेटवीत नाहींत. चूल न पेटविण्याची कोणी प्रतिज्ञा केलेली नाहीं. परंतु दिवसां स्वयंपाक करणें फारसें कोणाला परवडत नाहीं. रात्रींच्या जेवणांतून जेवढें कांहीं शिळें-पाकें उरेल तेवढें लहान मुलांना दुसऱ्या दिवशीं खावयास मिळतें. दिवसभर उघड्यावर आंगणांत आई-वडील कामें करतात. लहान मुलांना जशी भूक लागेल तसतशी त्यांनीं शिदोरींतील शिळी भाकरी व तेल-तिखट खावें. मुलें तीन-चारदां असें खातात. मुलें शाळेंत जात नाहींत. सर्वांना कपडे नसल्यानें किंवा ते अतिशय जीर्ण झाल्यानें शाळेंतील मुलें या गरीब मुलांना चिडवितात. त्यामुळें मुलें घरीं राहणें पसंत करतात. एखादा मुलगा क्वचित् शाळेंत गेल्यास चारसहा महिन्यांत मुलाचें नांव शाळेंतून निघतें. मुलगा कायमचा घरीं राहतो आणि वरीलप्रमाणें शिळें अन्न खातो. रात्रीं ८॥ च्या सुमाराला ताजा स्वयंपाक होतो त्या वेळीं लहान मुलें बहुधा झोंपलेलीं आढळतात.

स्वयंपाक एकदां होतो याचा अर्थ मोठीं माणसें दिवसभर अगदीं उपाशी राहतात असें नाहीं. सकाळीं उठून बहुतेक बुरूड चहा पितात. चहा घरीं करण्याऐवजीं कांहीं बुरूड आठवडी बाजारांतील चहाच्या दुकानांतून चहा पितात. चहानंतर पान-तंबाखू, विडी अथवा क्वचित् सिगारेट पिऊन कामाला लागतात. कांहीं बुरूड घरीं चहा तयार करतात. दिवसांतून तीन-चारदां चहा, तंबाखू व पान यांवर खर्च करतात. प्रत्येकाचा हा खर्च सायंकाळच्या जेवणाच्या दुप्पट होतो. दिसावयाला एकदां रात्रीचें जेवण परंतु एकूण जेवणखर्चाच्या दुपटीनें हॉटेल-खर्च प्रत्येक बुरूड करतो. या संवयीनें १४ आणे सरासरी प्राप्तींतून ७ आणे दिवसभराच्या चहा-पानांवर खर्च होतो. ह्या खर्चानें भूकहि शमत नाहीं. उरलेल्या ७ आण्यांत जेवण, कपडे, सणवार, औषधपाणी, घरभाडें, सरपण इत्यादि खर्च होतो. अशा रीतीनें वास्तविक चांगली प्राप्ति असून देखील शिक्षणाच्या अभावीं दुर्दशा त्यांच्या पदरांत पडते. अशा वेळेला सामाजिक क्रांतीची आवश्यकता भासूं लागते.

घरांची व्यवस्था पाहिल्यास असें आढळून येतें कीं, बुरुडांच्या ३१ कुटुंबांपैकीं २० कुटुंबांना रहावयाला भाड्यानें खोल्या मिळाल्या आहेत. बाकीचीं अकरा कुटुंबें सडकेवर दोन बांबूंच्या आधारावर उभारलेल्या लहानशा खोपटांत आपापला संसार चालवितात. पहिलीं २० कुटुंबें एकूण ६ खोल्यांत राहतात. एका खोलीची लांबी-रुंदी १५ फूट × १२ फूट एवढी आहे. अशा एका खोलींत ४ कुटुंबांचा संसार थसलेला आहे. निरीक्षण केलें त्या वेळीं असें आढळलें कीं, याच खोलींत ४ कुटुंबापैकीं एका कुटुंबांतील एक बाई बाळंतीण होऊन सहा दिवस










झाले होते. बाळ व बाळंतीण जमिनीवर जुनें चिरगुट आंथरून निजलीं होतीं. खोलीच्या चार कोपऱ्यांत ४ चुली होत्या. तीन विटा मांडल्या म्हणजे त्यांची चूल तयार होते. चारहि कुटुंबांत कोणाकरितांहि निजावयाला खाट नव्हती. खाटा या खोलींत मावणार नाहींत व सर्वांची गैरसोय होईल म्हणून कोणी वापरीतहि नाहींत. एका खोलींत ४ कुटुंबांचा संसार आडोशा-पडद्यावांचून चालतो. कोणालाहि एकटें निवांत बसावयाला जागा नाहीं. चारहि कुटुंबांचा सार्वजनिक संसार एका खोलींत आहे. या चार कुटुंबांपैकीं एका कुटुंबांत एक विधवा बाई व तिची म्हातारी आई अशा दोघी आहेत. दुसऱ्या कुटुंबांत एक विधवा बाई व तिची मुलगी आहे. तिसऱ्या कुटुंबांत एक पुरुष, त्याची बायको व ४ मुलें आहेत. चौथ्या कुटुंबांत एक म्हातारें जोडपें आहे. अशा रीतीनें ४ कुटुंबांत एकूण १२ इसम राहतात. प्रत्येक कुटुंबाचा खर्च आपआपल्या कमाईनें चालतो.

या खोलींत चारहि कुटुंबांचें सामान अशा प्रकारें आढळलें. प्रत्येक कुटुंबाला स्वयंपाकाला एक तवा, तीन ॲल्यूमिनिअमचीं लहानमोठीं पातेलीं, पाणी पिण्याचा एखाद दुसरा पितळेचा लोटा व ग्लास आणि पाणी आणण्याची एकादी बकेट. आणि पाणी साठविण्याकरतां मातीचें मडकें. यापेक्षां इतर सामान आढळलें नाहीं. पेट्या, ट्रंका, कोणाकडेहि नव्हत्या.

कपडे पाहतां असें दिसलें कीं, स्त्रियांना एक लुगडीजोड आहे. लुगड्याची सरासरी किंमत सहा रुपये पडली. स्त्रिया चोळ्या वापरीत नाहींत. गोंडांत स्त्रियांनीं चोळी घालणें वर्ज्य आहे. तथापि, नव्या पिढींतील कांहीं स्त्रिया चोळ्या वापरतात. पुरुषांना एक धोतरजोडी, व दोन सदरे यांपेक्षां अधिक कपडे नाहींत. कांहींच्या डोक्याला आहे. तर कांहीं बुरुड बोडके राहतात. कित्येक बुरुडांना एकेरीच कपडे आहेत.

अंथरुण-पांघरुणाची तर कथा विचारूंच नये. एखादें जुनेरें किंवा गोधडी अंथरण्यास असते. धोतर किंवा लुगडें हें त्यांचें पांघरूण होतें. सतरंजी, कांबळ, गादी कोणाकडेहि आढळणार नाहींत. थंडीच्या दिवसांत कांहींजण शेकोटी पेटवून ऊब आणतात.

खोलींत कोणाकडेहि आठ दिवस पुरेल एवढा धान्याचा संग्रह आढळणार नाहीं. सायंकाळाची कमाई बुरुड लोक सायंकाळींच खर्च करतात. रोजच्या रोज मीठ, मिरची, तेल, डाळ, ज्वारी इत्यादि वस्तू विकत आणतात. एका कुटुंबाला सामान्यपणें मीठ दोन पैशाचें, मिरची एक आण्याची, गोडें तेल एक आण्याचें, रॉकेल दोन पैशाचें, मसाला दोन पैशाचा, डाळ पांच आण्यांची व ज्वारी किंवा तांदूळ पंधरा आण्यांचे—एवढें सामान खरेदी करावें लागतें. सरासरी १॥ रु. रोजीं जेवणावर खर्च होतो. हें जेवण रात्रीं एकदांच होतें.

सामान मुळींच नसल्यानें चार कुटुंबें एका खोलींत राहूं शकतात. सामानाची अडगळ मुळींच नाहीं. धान्याचा सांठा व वस्तूंचा संग्रह कोणा-कडेहि आढळणार नाहीं. 'अशाश्वतसंग्रह' बुरुडांनीं केलेला नाहीं! 'साधें जीवन'!

इतकें असूनही बुरुडांना कर्ज झालेलें आहे. कर्जाच्या रकमांवर सामान्यपणें दर रुपयाला एका आठवड्यास एक आणा व्याज द्यावें लागतें. अशा रीतीनें १० रुपयांचें एक महिन्याचें २॥ रु. व्याज द्यावें लागतें. म्हणजे दरसाल ३०० रु. व्याजाचा दर पडतो. एका बुरुडानें आपली स्वतःची हकीकत अशी सांगितली : त्यानें एक वर्षा-पूर्वीं ५ रु. कर्जाऊ आणले. या ५ रुपये मुद्दलाचें दर आठवड्याला ५ आणे व्याज तो नियमितपणें देत आहे. अशा रीतीनें महिन्याचे १ रुपया ४ आणे व्याज तो देतो. गेल्या वर्षांत १५ रुपये व्याज सावकाराला त्यानें दिलें. हा १३ वा महिना चालू आहे. शिवाय मुद्दल ५ रुपये शिल्लक आहेच. त्यामुळें बुरुड किती गांजलेलें आहेत, याची सहज कल्पना येते.

दारूबंदी झाल्यापासून बुरुड जबरदस्तीनें निर्व्यसनी झाला आहे; परंतु चहाचें वेड कमाईच्या मानानें भलतेंच वाढलेलें आहे.

१३८ बुरुडांपैकीं एका-दोघांना लिहितां वाचतां येतें. बाकीचे निरक्षर आहेत.








अशा प्रकारें सुमारें १ लक्ष किंमतीची संपत्ति केवळ पोकळ बांबूमधून निर्माण करणाऱ्या १३८ बुरुडांची थोडक्यांत भीषण दुर्दशा आहे.

या बुरुडांना एक वर्षात २८,८०० रुपये किंमतीचा बांबू विकत आणावा लागतो. आणि ७२,००० रु. किंमतीचा माल ते विरकाळितपणें विकतात. अशा रीतीनें एक लक्ष आठशें रुपयांचा व्यापारी व्यवहार ८० बुरुडांच्या श्रमकौशल्यानें चालतो. बुरुडांचें बांबूचें दुकान नाहीं. आणि त्यांच्या वस्तू विकण्याचें त्यांचें स्थायी दुकान नाहीं. हा व्यापार दुसरेच करतात व नफा कमावतात. या बुरुडांचें सहकारी दुकान त्यांच्याच मदतीनें त्यांच्या शेजारीं राहाणाऱ्या सुबुद्ध जनतेनें चालविल्यास पांच वर्षांच्या अवधींत १० हजार रुपये किंमतीचें बुरुडांच्या सार्वजनिक मालकीचें सहकारी दुकान आपल्या पायावर उभें राहूं शकेल आणि मध्यस्थांचा नफा पुष्कळसा कमी करतां येईल. त्यामुळें बुरुडांची आर्थिक स्थिति सुधारण्याला मदत होईल. पुढें याच सहकारी दुकानांतून धान्य, कापड, व जीवनोपयोगी इतर वस्तू ठेवतां येतील. एकदां बुरुडांची आर्थिक स्थिति थोडीफार सुधारली म्हणजे पुढें उत्तमोत्तम कलेच्या व नक्षीदार वस्तू ते निर्माण करूं शकतील. त्यामुळें त्यांच्या वस्तूंना मोठी मागणी मिळूं शकेल. वर्ध्याच्या या १३८ बुरुडांच्या स्थितीप्रमाणें इतर ठिकाणच्या बुरुडांची अशीच अवस्था असण्याचा संभव आहे. सर्वत्र सहकारी तत्वावर प्रयत्न करून आज हीनावस्थेला पोहोंचलेल्या कष्टाळू, गरीब जनतेची आर्थिक व सामाजिक सुस्थिति निर्माण करणें प्रत्येक नागरिकाचें कर्तव्य ठरतें.

बुरुडांच्या गृहोद्योगांत सुबक कलेच्या वस्तू निर्माण करण्याला भरपूर वाव आहे. मेहनती बुरूड, आपलें आर्थिक जीवन कसें सुधारलें जाईल आणि या स्वातंत्र्याच्या कालांत आपली सामाजिक उन्नति केव्हां होईल, याची उत्कंठेनें वाट पाहत आहेत. जीवनाला आवश्यक वस्तू निर्माण करणाऱ्या परंतु दुर्दशेचें जीवन कंठणाऱ्या बुरुडांची अवहेलना व उपासमार स्वतंत्र हिंदुस्थानांत होत आहे.

ज्या वर्ध्याला हे कारागीर असलें उपेक्षित जीवन घालवीत आहेत तें वर्धा शहर विधायक कार्याबद्दल बऱ्याच वर्षांपासून प्रसिद्ध आहे. विधायक कार्य करणाऱ्या संस्थांच्या आसमंतात् हे बुरूड राहतात. गृहोद्योग करणाऱ्या कारागिरांची उपासमार अखिल-भारतीय-ग्रामोद्योग-संस्थेच्या डोळ्यांदेखत चालू आहे. बुरुडांचा धंदा ग्रामोद्योगांत अंतर्भूत आहे, हें सांगण्याची आवश्यकता नाहीं. बाहेर, दूरवर पाहून चालण्याऐवजीं जवळ, आसपास पाहून चौकसपणें एकेक पाऊल पुढें टाकीत जाण्यानें सर्वांची प्रगति होणार आहे.

विधायक कार्यातच आमच्या स्वराज्याचें सार आहे. राजकीय सत्ता प्राप्त होऊन तीन वर्षे झालीं. या कालावधींत बुरुडांची अवस्था जशी सुधारली नाहीं तशी त्यांच्यासारख्या अनेक कारागिरांची अवस्था-पूर्वीसारखीच आहे. कांहीं फरक पडलेला दिसत नाहीं. बुरुडांच्या टोपलींत स्वातंत्र्य पडलेलें दिसत नाहीं. बुरुडांची व त्यांच्यासारख्या अनेकांची आर्थिक व सामाजिक स्थिति सुधारण्याकरतां विधायक कार्य करणाऱ्या संस्था डोळे उघडे ठेवून पुढें सरसावल्या पाहिजेत. म्हणजे आर्थिक विषमता दूर करतां येईल.

ज्या विचारी नागरिकांस आर्थिक समतेची चाड आहे, ज्यांस परंपरागत श्रीमंतीमुळें काळ्या बाजाराच्या जोरावर किंवा उच्च नोकरीच्या अधिकारामुळें गाद्यागिरद्यांवर लोळत पडून राहण्याचीं व्यसनें लागलेलीं नाहींत, त्या सर्वांनीं आपापल्या क्षेत्रांत स्वराज्याधिकाऱ्यांच्या मदतीनें किंवा अशी मदत न मिळाल्यास त्याची तमा न बाळगतां कष्टप्राय जीवन घालविणाऱ्या आपल्या बांधवांस निदान पोटभर अन्न, ऊन-वाऱ्यापासून रक्षण करणारी झोंपडी व अंगभर पुरेसा कपडा शक्य तितक्या लवकर कसा मिळेल, याची चिंता बाळगली पाहिजे.



श्री. त्र्यं. सी. कारखानीस

# केशवसुतांच्या 'तुतारी' चे पडसाद

[ प्रस्तुत लेख व त्यांतील कविता यांचे लेखक श्री. त्र्यं. सी. कारखानीस हे 'महाराष्ट्र नाटक मंडळी'चे संस्थापक आणि चालक, 'राजाचें बंड' आणि 'स्वैरिणी' या नाटकांचे कर्ते आणि एक नाट्यव्यासंगी लेखक म्हणून महाराष्ट्रांत प्रसिद्ध आहेत. 'नवभारतां'त ते पहिल्यापासून मधूनमधून लिहीत आले आहेत. आज ७७ वर्षांचे असूनहि त्यांचा व्यासंग—नववाङ्मयाचा अभ्यास—चालू आहे, याची कल्पना त्यांच्या लेखां-वरून 'नवभारता'च्या वाचकांना आलेली असेल—प्रस्तुत लेखांत त्यांनीं ४० वर्षांपूर्वी केलेल्या कवितां-पैकीं कांहीं अप्रकाशित कविता दिल्या आहेत.—चाळीस वर्षांपूर्वीचा काळ. केशवसुत नुकतेच दिवंगत झाले होते. त्यांच्या 'तुतारी'नें मराठी काव्यप्रांत निनादून टाकला होता. नवीन उदयोन्मुख कविमनांत नवचैतन्य उत्पन्न झालें होतें. ११ जानेवारी १९११ रोजीं 'तुतारी-मंडळ' स्थापन झालें. या 'तुतारी-मंडळा'च्या द्वारें आपल्या तरुण कविमनांतून जे 'तुतारी'चे पडसाद कवितांच्या रूपानें उमटले त्याचे कांहीं नमुने श्री. कारखानीस यांनीं सादर केले आहेत. गोविन्दाग्रज, बालकवि इत्यादि पुढें प्राथितयश झालेली मंडळी या कवितांचे श्रोते आणि 'तुतारी मंडळा'चे सदस्य होते, हें वाचून वाचकांना मोठी मौज वाटेल, यांत शंका नाहीं.—का. संपादक ]

आमचें 'तुतारी-मंडळ' ता. २१ जानेवारी १९११ रोजीं स्थापन झालें व तें 'महाराष्ट्र नाटक-मंडळी'चा मुक्काम पुण्यास असतांना मंडळींतच स्थापन झालें. त्या वेळीं श्री. राम गणेश गडकरी (गोविंदाग्रज) हे पुण्यांतच राहत होते व श्री. गणेश नारायण टिपणीस (कवि भालचंद्र) हेहि त्या वेळीं पुण्यांत न्यू इंग्लिश स्कूलमध्यें मास्तर असून मंडळींतच राहत होते. 'भालचंद्र' हे माझे ग्रामस्थ व स्नेही. गोविंदाग्रजांची व माझी पूर्वीं थोडी ओळख होती. पण त्या वेळीं 'गोविंदा-ग्रज' या नांवानें ते प्रसिद्धीस आलेले नव्हते. किर्लोस्कर-मंडळींतील 'मास्तर' म्हणून त्यांची ओळख इ. स. १९०७ पासून झालेली होती. पण कवि या नात्यानें त्यांची ओळख इ. स. १९११ मध्यें झाली. आम्ही तिघेहि 'केशवसुतां'चे चहाते होतों व त्यांच्यामुळें ज्याला इंग्रजी साहित्यांत Romanticism म्हणतात अशा प्रकारच्या स्वातंत्र्याच्या कल्पनांनीं आम्ही तिघेही भारले गेलेलों होतों. मनांतील स्वतंत्र व उच्च विचारांचा प्रसार करण्यासाठीं एक मासिक काढण्याचें आम्हीं ठरविलें व ज्या केशवसुतांच्या 'तुतारी'मुळें आम्हांला जागृति मिळाली त्या काव्याचेंच 'तुतारी' हें नांव त्या मासिकाला देण्याचें ठरवून त्यासाठींच हें 'तुतारी-मंडळ' आम्हीं स्थापन केलें. या मंडळाचें मुख्य कार्य म्हणजे 'तुतारी'साठीं लेखसामग्री तयार करून ठेवणें हें होतें. ता. ११ जानेवारी १९११ ला रविवार होता. दर रविवारीं प्रत्येकानें आळीपाळीनें आपले स्वतंत्र विचार व








कल्पना कोणत्याहि रूपानें प्रकट करून मंडळांत वाचून दाखवावयाचा कार्यक्रम ठरला. त्याप्रमाणें पहिल्या रविवारीं 'गोविंदाग्रजां' नीं 'केशवसुत मेले?' ही कविता केली. ती 'वाग्वैजयंती'-च्या पहिल्या आवृत्तींत पृ. ३७ वर आहे. दुसरा रविवार ता. २६-२-११ हा मजकडे होता. त्यासाठीं लिहिलेली कविता 'भूक!' ही पुढें दिली आहे:

## भूक!

मिरिंग राजा, पाणी पाणी!
ताप जगाचा करपवि सारा
हृदयभूमिचा अमोघ पेरा
जलदा! तव कोठें जलधारा!
कां करविसि मज 'पाणी पाणी'? ॥१॥

तापानें उकलेल अशा या-
हृदयीं माझ्या, बीजकल्पना
असति पेरल्या कितीक नाना
पिकें वाणिचीं येतिल त्यांना
आशेनें या करितों 'पाणी!' ॥२॥

अहा कल्पना पिकास येतां
गंध पिकाचा दिगंतिं जाईल
जितीं जितीं तीं भरभरतिल
प्रेतेंही भुकभुकुनी उठतिल
भावि सृष्टिची उडेल गडबड! ॥३॥

परंतु सांप्रत मीच भुकेला!
केला धान्याचा ना सांठा
रिताचि हा 'आ' पसरुनि कोठा
वाढ भयंकर होतो मोठा
बीजांवांचुनि जवळि न कांहीं ॥४॥

बीजें काय गिळावीं म्यां मग?
शेतकऱ्यानें बियांस खावें!
हतदैवा! मग कां न मरावें?
आईनें गर्भास गिळावें!
मरो मरो! ही भूकच ऐशी ॥५॥

अरे बरळलों, चुकलों चुकलों
हताश होऊनि असा बरळशी!
पाण्याविण घाबरोनि जाशी?
'फुकाच मरतों' अशास भीशी?
वदसि भुकेला अभद्र भलतें? ॥६॥

हताश बावरलेल्या वेड्या,
नेणसि बापा, भूक कशाची
भूक असे ही परमात्म्याची
जी शमवाया अखिल सृष्टिची
पिकें पिकविलीं, पिकतिल किति तरि ॥७॥

अव्यक्ताला व्यक्त करावें
आंतिल तें बाहेर काढुनी
उलट भुकेची ही भागवणी
भरे पोट तें ओक-आकुनीं
भूक विचित्रा परमात्म्याची ॥८॥

अशा भुकेनें भुका असशि जरि
जाण जाण तूं धन्य स्वतांला
फुका मरण?-छे, मरण न तुजला
परमात्मा तव हृदयीं ठेला
त्यावांचुनि ही भूक अशक्याचि ॥९॥

अशी भूक लाभली कुणाला?
भाग्यवंत थोडके तयांना
जड कोठे वावरती नाना
मरण चुकेना अशा जडांना
काळ पचवुनी देतो ढेंकर ॥१०॥

अशा भुकेला अभद्र भलतें
बोलुं नकोरे-बोल बोल परि
थोडिच ही भुक दुसरी-तिसरी?
आत्मा येथें हा 'आ' पसरी
जड शाप तुझे खाकाचि होतिल ॥११॥

हताश वेड्या होउं नको तर
भूक भयंकर वाढूं दे ती
शमवाया तर बीजें असतीं
हृदयासम त्या फलदा शेती
पाणिच कां मग मिळेल ना तुज? ॥१२॥

पाण्याचा तो मिरिंग राजा
तुझ्याच ठायीं विरुनि राहिला
हृदयभूमिगत त्याच झऱ्याला



अनुक्रमणिका








अचुक नेमका हुडकायाला
फिरवि आंत पायाळु दृष्टि तव ॥१३॥

दृष्टीनें ती भूमि भेदुनी
हृदयाचें कर पाणिच पाणी
उगवूं दे मग तुझी पेरणी
नको काढुं ती अभद्र वाणी
' पाणी पाणी ', 'मरो भूक' अशि ॥१४॥

× × ×

तिसरा रविवार ( ५–३–११ ) ' भालचंद्र ' यांचा होता. त्यांनीं त्या प्रसंगीं केलेली ' दुःखाश्रुमार्जन ' ही कविता ' अभिनवकाव्यमाला ' भाग २ रा यांत प्रसिद्ध झाली आहे. रविवार चौथा ( १२–३–११ ) पुन्हां गोविंदाग्रजांकडे आला. त्या प्रसंगीची त्यांची कविता ' ये ये ये कविते ' ! ही ' वाग्वैजयंती 'च्या पहिल्या आवृत्तींत पृष्ठ १८६ वर आहे.

× × ×

' तुतारी-मंडळा 'चीं आणखी कांहीं टांचणें सांपडलीं. त्यांवरून ' मंडळा 'ला ' बालकवि ' ( त्र्यं. बा. ठोंबरे ), शंकर परशुराम जोशी (' विचित्रलीला 'कर्ते ), श्री. बाबूराव दिघे ('गोविंदाग्रजां'चे मामेभाऊ ), शं. ग. गडकरी ( मंजुवाळ, गोविंदाग्रजांचे धाकटे बंधु ), रघुनाथ दिघे ( अलीकडे ज्यांनीं ' पाणकळा ' वगैरे कादंबऱ्या लिहिल्या आहेत ते. हे त्या वेळीं अगदींच लहान, इंग्रजी ३ ऱ्या इयत्तेंत होते. त्यांच्या अंगीं त्या वेळींहि कवित्वगुण असल्याचें दिसून आल्यामुळें त्यांनाहि मंडळांत सामील करून घेतलें)—याप्रमाणें पांच सभासद अधिक मिळाले. आम्ही तिघे मूळ सभासद. क्रमानें त्या तिघांच्या जोडीला तीन रविवारांसाठीं नवीन सभासदांची वांटणी पुढीलप्रमाणें केली होती :

१ ला रविवार—गोविंदाग्रज, शं. प. जोशी, बाबूराव दिघे.

२ रा रविवार— त्र्यं. सी. का. (श्रीराम), बालकवि ठोंबरे, शं. ग. गडकरी.

३ रा रविवार—भालचंद्र, बालकवि रघुनाथ. येवढें टांचण आढळतें. पण सर्वांचेंच लिखाण सांपडलें नाहीं. फक्त 'बालकवि' ठोंबरे यांचा 'अरुण' मंडळांत वाचला गेला. तो एकनाथ यादव निफाडकर यांनीं संपादन केलेली ' बालकवींची समग्र कविता ', भाग १ ला, यांत प्रसिद्ध झाला आहे.

बालकवींचा ' अरुण ' ऐकून अगदीं निराळ्या दृष्टीनें गोविंदाग्रजांनीं ' अरुण ( दुसरा ) ' ही कविता रचून मंडळांत वाचली. ती 'वाग्वैजयंती'च्या पहिल्या आवृत्तींत पृ. १७५ वर छापली आहे. त्यानंतर ' भालचंद्रां 'नींहि आपला ' अरुण ' लिहिला. तो कोठें प्रसिद्ध झाला असल्यास— बहुधा ' मासिक मनोरंजन ' मध्यें झाला असेल— स्मरत नाहीं. त्यांच्या खासगी हस्तलिखितांत तो सांपडेल. त्याच क्रमानें मींहि एक ' अरुण ' लिहिला, तो खालीं दिला आहे :

### अरुण

तेजाचे ते असंख्यात कण विस्कळीत सारे
सांठविले रजनीनें तम परि घोरघोर पसरे
घोर तमोमय हृदयीं ऐशा प्रवेश दिव्याचा
होतां रंगें हृदय, तोच हा रंग दिसे त्याचा ॥१॥

रजनीची अनुपमेय शोभा डोळीं देखावी
उत्कट इच्छा रविची परि ती हट्टी नच पुरवी
हळुंच चोरटा वेष घेउनी डोकावुनि पाही
रंगाऱ्याचा वेष चोरटा रंग कुठें जाई ? ॥२॥

येतां येतां पूर्व दिग्वधू अडवी द्वारांत
रवि चुंबी मुख तिचें खुले हा प्रेमरंग त्यांत ॥३॥

उदयदेवतापूजन सृष्टि करि सद्भावानें
त्या पूजेंतिल हींच हरिद्रा-कुंकुमयुत सुमनें ॥४॥

आत्म्याची का प्रथम जागृति झोंपेंतुनि झाली
जगज्जननिचा पान्हा हा का फुटे याच कालीं ॥५॥

मुग्धेनें का स्वप्न पाहिलें, जागी मग झाली ?
अनुस्मृतीनें छटा उमटली लज्जेची गालीं ॥६॥

रंग फुलांचें, द्युति ताऱ्याची, वृत्ती बालांची
सृष्टी पूर्वीं अशीच विलसे एकरूप साची ॥७॥

... ... ...

संध्यासमयीं रक्तवारुणी दिवस फार प्याला
झोकांडी जाउनी निशेच्या गुंगींतचि पडला












आंधेरी ओळ्यांवर आली, तारे लकलकले
निशेंत सारे तारे तारे--स्वप्नचि हें पडलें
निशा उतरतां नेत्र किलकिले जों त्यानें केले
शेष वारुणीप्रभाव दिसला, अरुण नाम चाले ॥१॥

दुष्ट निशाचर संध्यासमयीं टपुनि जसे बसले
झडप घालुनी सूर्याला मग त्यांनीं पळवियलें
निशादेविला अर्पण करण्या बळि त्याला केलें
रक्तवर्ण हा चढवुनि बळिचा इथें त्यास अणिल
उदयकाल भाग्याचा त्याचा तोच परी ठरला
झुगारिला बळिवेष निशाचरगणही पळवियला ॥२॥

केतुहुनी दृढग्रास मना बहु जाची रजनीचा
मोक्षसमयिं हा रवि फेंकीं जणुं कटाक्ष रागाचा ॥३॥

जातां लत्ताप्रहार रजनी करि रविच्या गालीं
दंतांतुनी जें रक्त निघालें त्याची ही लाली ॥४॥

कीं पळतां ही रजनी, रविनें चांवा चरणांचा
घेतां भरलें रक्त मुखांतचि, गुळणा हा त्याचा ॥५॥

नभःप्रांत सोडितां रजनिचें जळे हृदय रागें
त्या ज्वाळेची प्रभा 'अरुण' ही रविमुखिं कीं रंगे ॥६॥

तेजस्वी रविवरासि येतां पाहुनि रजनी ती
भुलली कुलटा हृदयभेद करि इंदूचा असती
त्या हृदयांतिल रक्ताचा हा टिळा रमणभालीं
लावुनि मृतपतिसमक्ष रविकरपाशीं मग विरली ॥७॥

ब्रह्मांडाला आग लागली पाताळीं पहिली
ठिणग्या जीच्या उडुनि रात्रभर येती आभाळीं
त्या आगीची लाल शिखा ही वरवर का येते
व्यापिल का ही अवनी सारी, व्याकुळ मन होतें ॥८॥

निशापतीला गतप्राण तो दिवस करी म्हणुनी
झाली विधवा रजनी तीच्या काय दिसे वदनीं ?
सूर्याचा फटफटीत विठ्ठल-टिळा अजुनि नाहीं
पूर्वींच्या सौभाग्याची ही छाया का राही ? ॥९॥

प्रतापशाली नरवर आतां उदया येणार
कृष्णहृदयिं खल महामत्सरी खळबळले फार
विरोध करूनी दाबायाचा यत्न त्यास करिती
आग हृदयिंची पांखडुनीही पित्तहि खल वमती ॥१०॥

---

## शॉंचें तत्त्वज्ञान कोणतें ?

'चिच्छक्ति' या एका शब्दांत तें सामावलेलें आहे, या विश्वाच्या बुडाशीं ही चिच्छक्ति (बेर्गसॉं यांची 'लाईफ फोर्स') आहे. ही शक्ति आपलें रूप आकलन करून घेण्याचा प्रयत्न करीत असते, अशी शॉंची श्रद्धा होती. सबंध विश्वविकास अगर जीवनविकास हा या चिच्छक्तीच्या आत्मज्ञानाच्या प्रयोगाचा खेळ आहे असें त्यांचें म्हणणें होतें. प्रारंभीं मोठमोठे पाणघोड्यांसारखे अगर राक्षसी जलचरांसारखे अजस्र प्राणी तिनें निर्माण केले. पण शक्तीचे अवाढव्य प्रयोग आत्मज्ञानासाठीं पुरेसे पडत नाहींत असें तिला आढळून आलें. तेव्हां या शक्तीनें एकाहून एक सुंदर असे प्राणी निर्माण केले. पण केवळ शारीरिक सौंदर्यहि या कामीं अपुरें ठरतें असा अनुभव आल्यामुळें या चिच्छक्तीनें बुद्धिधारी मानव निर्माण केला. मानवानें, बुद्धि ही जी अपूर्व वस्तु त्याला प्राप्त झाली आहे तिच्या साहाय्यानें, चिच्छक्तीचें हें कार्य जाणून घेऊन त्याला हातभार लावणें हें त्याचें कर्तव्य आहे, असें शॉंचें म्हणणें होतें. डॉर्विनचा विकासवाद हा आंधळा, निसर्गशक्तीचा निर्दय खेळ आहे, तर शॉंचा विकासवाद डोळस, एका विशिष्ट ध्येयानुसार चाललेला आहे. या ध्येयपूर्तीसाठीं मानवाच्या बुद्धीचा, त्याच्या मेंदूचा विकास होऊन मानवाचें रूपान्तर अति-मानवांत किंवा श्रेष्ठतर मानवांत झालें पाहिजे. मानवाचें रूपान्तर परमेश्वरांत करण्याचा चिच्छक्तीचा जो मानस आहे त्याला हातभार लावणें, हें मानवाचें कर्तव्य आहे. परमेश्वरानें मानव निर्माण केला, हें शॉंना मान्य नाहीं. मानव स्वतःचें रूपान्तर परमेश्वरांत करूं शकेल; चिच्छक्तीचेंच तसें आवाहन आहे. ही नियतीच आहे, पण नियतीचें ज्ञान करून घेऊन मानवानें तिला हातभार लावणें हेंच जविनसाफल्य होय, असें शॉंचें म्हणणें होतें.

—'नवशक्ति' (मुंबई) ३-११-५० च्या अग्रलेखांतून



अनुक्रमणिका






श्री. ज. वा. जोशी

# विश्वकुटुंबी गांधीजी

महात्मा गांधी ही ' हें विश्वचि माझें घर, ऐसी मति जयाची स्थिर ' अशा श्रेष्ठतम कोटींतील विभूति होती. ज्यांची अशी विश्वकुटुंबी मति व वृत्ति स्थिर होते, अशा महात्म्यांच्या हृदयांत आपपर, शत्रुमित्र अशा भेदभावनेला थारा मिळत नाहींसा होतो. गांधीजींनीं आपल्या हयातींत जें जें उपदेशिलें, जें जें आचरिलें त्याचे विषय व व्याप्ति कांहींहि असलीं तरी गांधीजींचे विचार, उच्चार, आचार व आंदोलनें या सर्वांची स्थिर बैठक जागतिक अशी होती. त्यांची तपोभूमि व कर्मभूमि बव्हंशीं हिंदुस्थान राहिली. तरी सुद्धां, हिंदुस्थानच्या सर्व समस्या सोडविण्याच्या त्यांच्या प्रयत्नांचें स्वरूप त्यांनीं कटाक्षानें असें राखलें कीं, त्यामुळें जगांतील मानवतेच्या समस्या कायमच्या सुटाव्या. निदानपक्षीं मानवतेच्या व्यापक समस्या सोडविण्यास येथील पद्धति जास्तींत जास्त साहाय्यक ठरावी. हिंदुस्थानांतील त्यांच्या विविध चळवळींचा हा जागतिक दृष्टिकोन लक्षांत घेऊन सुप्रसिद्ध ब्रिटिश लेखक एच्. जी. वेल्स यांनीं लिहिलें आहे कीं, " There would be much to be said of an Indian Nationalism based upon the idea of human brotherhood and the common future of mankind; for, if all these diverse peoples i. e. Indians can be fused, the whole world can fused. "— 'मानवमात्राचें परस्परबंधुत्व व त्यांच्या भवितव्याची एकरूपता, या तत्त्वांवर हिंदुस्थानांतील विभिन्न समाजघटकांत जें एक राष्ट्रीयत्व निर्माण केलें जात आहे, त्याचें महत्त्व फार मोठें आहे. कारण तेथील भरगच्च विविधतेंत हार्दिक ऐक्य एकराष्ट्रीयत्वाच्या स्वरूपांत निर्माण करण्यांत यश आलें तर, त्याच पद्धतीच्या अनुसार जागतिक ऐक्यहि घडवून आणणें शक्य होईल. '

गांधीजींचें विभूतिमत्त्व इतकें लोकोत्तर व संपन्न होतें कीं, आपल्या प्रिय भारताच्या चिरंतन गौरवाचें स्थान, जो पृथ्वीचा मानदंडरूप हिमालय, त्याचीच आठवण आपणांस हमखास व्हावी. नगाधिराज हिमालय हा भौतिक क्षेत्रांतील जसा अनन्यसाधारण चमत्कार, तसाच गांधीजींचें विभूतिमत्त्व हा आध्यात्मिक क्षेत्रांतील अनन्यसाधारण असा चमत्कार होय.

विज्ञानशास्त्रज्ञ आपणांस असें सांगतात कीं, लक्षावधि वर्षांपूर्वीं आपल्या भूमातेच्या उदरांत ' न भूतो न भविष्यति ' अशी भयंकर खळबळ उत्पन्न झाली, ती तीव्रतर होत होत तीव्रतम झाली, त्या वेदना पृथ्वीला असह्य होऊं लागल्या आणि अखेर ही खळबळ आंतल्या आंत दडपून टाकूं पाहणारे पृथ्वीचें कठिण कवच भंगून, नगाधिपति हिमालयाचा जन्म झाला. इकडे, मानवी जगांत परस्परस्पर्धा, कलह व युद्धें यांनीं निर्मिलेल्या जगद्व्यापी द्वेषाग्नीच्या दाहकतेनें, मानवता आंतून होरपळून निघूं लागली, तेव्हां मानवतेचें पुनरुत्थान करून जगांत बंधुभावाचें आणि शांतीचें साम्राज्य प्रस्थापित करण्यासाठीं भवितव्यतेनें गांधीजींच्या रूपानें ' न भूतो ' आणि कदाचित् ' न भविष्यति ' असा ' विश्व-मोहन ' निर्माण केला. गांधीजींची कृश मूर्ति ही रक्तपिपासू जगाला ' Warning Finger ' आहे. जगांतील श्रेष्ठींना



अनुक्रमणिका






त्यांच्या धोक्याच्या इशाऱ्याचा भावार्थ उमजलेलाहि आहे.

ज्या ज्या भाग्यवंतांना नगाधिराज हिमालयाचें साक्षात् दर्शन व सान्निध्य करून घेण्याचा सुयोग प्राप्त झाला, ते सर्वच त्याची उत्तुंगता व विशालता पाहून मंत्रमुग्ध झाल्यासारखे स्तिमित झाले, दिव्यता पाहून नतशीर्ष झाले, आणि अगाधता पाहून भयचकितहि झाले. गांधीजींच्या व्यक्तिमत्त्वांत सुद्धां हिमालयसदृश उत्तुंगता, विशालता, दिव्यता व अगाधता होती. स्वामी रामतीर्थांनीं हिमालयाबाबत असे उद्गार काढले आहेत कीं, मनुष्याच्या पार्थिव जड व अशिव भावनांचें दिव्य, मंगल व आध्यात्मिक विचारांत लीलेनें रूपांतर करणारी हिमालय ही एक प्रचंड रसायनशाळाच होय. गांधीजींच्याहि बाबतींत हे उद्गार यथार्थ ठरतात. गांधीजींनींहि हयातभर लहान-मोठ्या व्यावहारिक समस्याच सोडविल्या. ब्रह्मज्ञानाचा शुष्क काथ्याकूट त्यांनीं कधींच केला नाहीं. परंतु या व्यावहारिक समस्यांचें त्यांनीं एवढें उदात्तीकरण केलें कीं, त्यांची पार्थिव प्रश्नांची उकल आध्यात्मिक स्वरूपाची व आध्यात्मिक अधिष्ठानावरूनच झाली. हल्लींच्या काळीं राजकारण हें जीवनव्यापी बनलें आहे गांधीजींनीं राजकारणाच्या आध्यात्मिकीकरणाचें ( Spiritualising Politics ) कार्य सुसंगतपणें व तळमळीनें केलें. जी ' नृपनीति ' ' वारांगनेव ' असावयाची, ती आध्यात्मिक मूल्यांशीं एकनिष्ठेनें नांदेल, असा तिचा अंतर्बाह्य कायापालट करण्यासाठीं गांधीजींनीं भगीरथ प्रयत्न केले.

गतेतिहासाचें धांवतें अवलोकन केले तरी असें स्पष्टपणें आढळून येतें कीं, निरनिराळ्या राष्ट्रांत जेव्हां जेव्हां तीव्र अशांतता निर्माण झाली व तत्कालीन धुरीण अशी अशांतता शमवूं शकले नाहींत, तेव्हां तेव्हां तत्कालीन गरजेला पुरे पडतील असे अवतार-सदृश थोर पुरुष निर्माण झाले व त्यांनीं आपापल्या राष्ट्रांना कुचंबणेंतून व विफलतेंतून वर काढून, प्रगति-पथावर अग्रसर केलें. सामाजिक अशांततेच्या अंतर्गत दाहकतेंतून वर फेकले जाणारे, वैचारिक वा आध्यात्मिक पातळीवरचे थोर पुरुष-रूपी उद्रेक हे, भूकंप, ज्वालामुखी यांच्या निमित्तानें भौतिक जगांत होणाऱ्या उद्रेकांसारखेच वाटत नाहींत काय ? भारताच्या प्रदीर्घ जीवनांत तत्कालीन गरजेप्रमाणें निर्माण झालेली थोरथोर पुरुषांच्या मालिकेची अखंड सांखळी दिसून येते; व ही गूढ घटना आपलें एकमेव आशास्थान वाटते. निष्ठावंत, चिकाटीच्या व त्यागी अनुयायांच्या बाबतींत मात्र भारतीय श्रेष्ठ पुरुष विशेषत्वानें दुर्दैवी दिसतात.

सुमारें अडीच हजार वर्षांपूर्वीं आपल्या भारतांत भगवान् बुद्धांच्या रूपानें जगन्मान्यता मिळालेली एक अत्यंत महनीय विभूति अवतीर्ण झाली. परंतु जगाच्या तेव्हांच्या आतांच्या स्वरूपांत जमीन-अस्मानाचें अंतर पडलें आहे. दळणवळणाच्या आधुनिक प्रगत साधनांनीं हें विस्तीर्ण भूतल एकमेकांना आज आंगणओसरीप्रमाणें झालें आहे. कधीं नव्हती एवढी एकमेकांच्या हितसंबंधांची गुंतागुंत आज झाली आहे. जगतीतलाला व त्यावरील प्रगत मानवी समाजांना बाह्यतः इतकें कमनीय स्वरूप प्राप्त झालें आहे कीं, त्यावर आपण अत्यंत आकृष्ट व्हावें, एवढेंच नव्हे तर, हें सुख अखंड उपभोगतां यावें म्हणून मारुती-बिभीषणां-प्रमाणें जीवनाचा अमरपट्टा आपणांस मिळावा, असेंहि वाटावें. परंतु मानवाच्या आंतरंगांत डोकावून पाहिल्यास काय दिसेल ? नागडी स्वार्थबुद्धि आणि व्यांघ्रमर्कट यांच्या तीक्ष्ण दाढा व नखें तुम्हांला तेथें परजलेलीं आढळतील. आपल्या बुद्धि-बळानें जगाच्या उच्छेदाचें मर्मस्थान मानवानें अचूक हेरलें आहे; असा मर्माघात विदारक व सर्वंकष करतां येईल इतकीं प्रभावी संहारक शस्त्रास्त्रें आपल्या विज्ञानबळानें निर्मून त्याचे ढीग तो रचीत आहे. आज सर्व जग जणूं सुप्त ज्वालामुखीच्या तोंडावर निवास करीत आहे; व या प्रलयकारी ज्वालामुखीच्या उद्रेकाचे सूचक अंतर्निनाद जगभर घुमत असतांहि मनुष्य त्याची मोठीशी कदर करतांना आढळून येत नाहीं.

नजीकच्या भविष्यकाळांत संघर्षाचें हालाहल सर्व जगभर पसरेल व जगाचा प्राणांतिक दाह होऊं लागेल, अशीं सर्व लक्षणें दिसत आहेत. हें हालाहल कसें प्राशन करतां येईल व जगाचें रौद्ररूप सर्वस्वीं पालटून त्याला नीलकंठ शंकराचें शिवस्वरूप कसें











अनुक्रमणिका

प्राप्त करून देतां येईल, याचा शुभसंदेश जगाला देणारी श्रेष्ठतम विभूति गांधीजींच्या रूपानें अवतीर्ण झाली. विश्वशांति, विश्वबंधुत्व व मानवमात्राचें हार्दिक ऐक्य व चिरकल्याण हीं साधण्यासाठीं गांधीजींनीं मानवी जीवनाच्या सर्व क्षेत्रांत जे महान्, मूलगामी व क्रांतिगर्भ प्रयोग केले, त्यांना आज इतिहासांत तोड नाहीं.

' सत्य ' गांधीजींचा परमेश्वर होता; व ' अहिंसा ' हा त्यांचा उपासनामार्ग होता. आपल्या वेदान्त-तत्त्वज्ञानाचा अखेरचा सिद्धान्तहि ' एकं सत् विप्रा बहुधा वदन्ति ' हाच आहे. विप्रांनीं मात्र,–मग ते धर्मक्षेत्रांतील किंवा विज्ञान-क्षेत्रांतील विप्र असोत,–' बहुधा वदन्ति ' या उत्तरपदावरच अधिकाधिक जोर दिला; व त्यामुळें 'एकं सत्' या पायाभूत आधिष्ठानाशीं अनुसंधान राहिलें नाहीं. सृष्टीच्या विभिन्नतेचाच विचार व तदनुरूप आचार शतकानुशतकें होत राहिला. परिणामतः एकत्वाची भावना बळावण्याऐवजीं वेगळेपणाचीच श्रद्धा दृढमूल होत गेली. या दुहीच्या बीजाला हितविरोधाचीं मुळें व संघर्षाच्या फांद्या फुटल्या. हें द्वैताचें पीक कालेंकरून जगभर उदंड माजलें आणि मंगल जगाचें जंगल बनलें. आणि त्यांतील मानवप्राणी हिंस्र श्वापदांप्रमाणें माणुसकीचें व्यक्तिशः, संघशः व राष्ट्रशः खून पाडूं लागला. जगानें या जंगली मार्गापासून परावृत्त व्हावें, सत्याधिष्ठित अभेदभावना जोपासावी व एकाच चिच्छक्तीचीं आपण सर्व लेकरें आहोंत, याची मनाशीं पक्की खूणगांठ बांधून, सर्वांशीं नितान्त बंधुप्रेमानें वागावें, यांतच जगाचा तरणोपाय आहे, हें सोज्वळ सत्य जगांत उद्घोषण्यासाठींच भवितव्यतेनें गांधीजींना जन्मास घातलें. हें नियतकार्य त्यांनीं फार वैशिष्ट्यपूर्ण रीतीनें, खुबीनें व चातुर्यानें केलें आहे. गांधीजी भारताचे भाग्यविधाते बनले, त्याचें रहस्य त्यांच्या प्रेरकशक्तीप्रमाणेंच त्यांचें योजनाचातुर्य, संघटनाकौशल्य यांतहि सामावलेलें आहे.

आधुनिक जगाच्या गरजेनुसार अहिंसात्मक क्रांतियुद्धाची गीता जगाला सांगणारा भारतीय कृष्णाचा नवावतार गांधीजींच्या रूपानें आपणांतच होऊन गेला आहे. कृष्णावतारांत कृष्णानें कंसाला मारलें होतें; परंतु या विसाव्या शतकाची विकृति जणूं काय जगाला उघडी करून दाखविण्यासाठीं भवितव्यतेनें या प्रसंगीं कंसाकडून कृष्णाला मारवलें आहे. जगताला आकर्षून घेणारें ' कृष्णतत्त्व ' प्रेम हेंच होय. केशवसुतांनीं जगांतून प्रेमभावना नष्ट झाली तर काय होईल, त्याचें ' भीतीनें मरतील मानवकुळें, प्रीति निमाली तर ' असें मोठें चटका लावणारें वर्णन केलें आहे. कंसवृत्ति दुर्दैवानें प्रबळ झाली तर प्रेमस्वरूपी ' मोहन ' अस्तंगत होईल व उभें जग तामसी प्रवृत्तीच्या मूढ बनविणाऱ्या अंधकारानें व्यापलें जाईल, हाच संदेश गांधीजींची हत्या आपणांस देत नाहीं काय ?

गांधीजींचा संदेश हा सर्व जगाला अनुलक्षून आहे आणि सर्व जगानें सामुदायिक रीत्या तो अंमलांत आणण्याचा प्रयत्न निष्ठेनें केला पाहिजे. जगांतील भिन्न भिन्न राष्ट्रांतील जनता निदानपक्षीं, त्यांतील राष्ट्रसूत्रधारांची धारणा अहिंसानुकूल होईल तर या तत्त्वांचें जागतिक परिपालन एक-समयावच्छेदेंकरून होण्यास अडचण दिसत नाहीं. संजीवक सहकार्य किंवा विनाशक संहार या परस्पर-विरुद्ध मार्गांपैकीं कोणता मार्ग पत्करावयाचा, हा सवाल निर्वाणीच्या स्वरूपांत आज सर्व राष्ट्रांपुढें खडा आहे. अगतिकत्वामुळें का होईना, सत्य-अहिंसा-सहकार्य हा मनुष्योचित मार्ग जगाला स्वीकारलाच पाहिजे, अशी आणीबाणीची वेळहि आली आहे. परंतु अभिनिवेशाच्या मोहनिद्रेंत चूर असणारा मानवी कुंभकर्ण भवितव्यतेजवळ काय मागणें अखेर मागेल, कांहीं निश्चित सांगतां येत नाहीं. या विमूढ कुंभकर्णानें कांहीं अमंगल वर मागितल्यास विश्वकल्याण चिंतिणाऱ्या व गांधीजींवर श्रद्धा-प्रेम असणाऱ्या आपल्या प्रिय भारतवर्षानें काय करावें, यालाहि कांहीं उत्तर आपणांस दिलें पाहिजे.

' वाइटाचाहि अप्रतिकार ' हें भगवान येशू ख्रिस्तांचें तत्त्वज्ञान होतें; व तें त्याच्या ' कुणीं एका गालांत मारली तर दुसरा गाल पुढें कर ' या आदेशांत सूत्ररूपानें ग्रथित झालें आहे. जगाच्या कमनशिबानें अजून ' चांगलें ' (Good) हें दुर्बळच राहिलें आहे ! ' दुष्टता ' (Evil) इतकी

अधम झाली आहे कीं, चांगल्याचा शिरश्छेद करून ती तिचे रक्त सोशीत बसणारे गालच जमीन-दोस्त करते. जगाच्या सौभाग्यानें उद्यां ' चांगलें ' समर्थ बनलें व त्याचें आधिक्यहि झालें तर, महात्मा ख्राईस्टच्या या प्रेममय अनुशासनाचें आपणांस पालनहि करतां येईल. व्यवहारदृष्टि धड असणाऱ्या गांधीजींनीं, आजच्या जगाच्या परिस्थितींत अप्रति-काराच्या तत्त्वाचा पुरस्कार म्हणूनच केला नाहीं. ख्रिस्ताच्या उपदेशांत प्रेममार्गाचा परमोत्कर्ष आहे, हें कोण नाकारूं शकेल ? पण तें ' सतीचें वाण ' आहे. त्यासाठीं जगाची कांहीं पूर्वतयारी करणें अपरिहार्यच होतें. म्हणून अमंगळाचा, अशिवाचा, दुष्टतेचा सर्वांनीं सदैव प्रतिकार करण्याचाच आदेश गांधीजींनीं दिला आहे. अर्थातच, त्यांनीं असा प्रतिकार अहिंसात्मक सत्याग्रहाच्या द्वारां करावा, असा कटाक्षहि ठेवला आहे. संहाराच्या विनाशक गर्तेतून जगाला वर काढावयाचें असेल तर प्रतिकार सत्याधिष्ठित व अहिंसात्मकच हवा, हें काय सांगावयाला पाहिजे ? प्रतिकाराचा असा कायापालट होणें, ही आजच्या जगाची निकडी-ची गरज आहे. मात्र ही अहिंसा शूराची हवी, असें त्यांनीं वारंवार बजावलें आहे. भ्याडांची अहिंसा हा शब्दप्रयोग वदतोव्याघात आहे. भारतीय जोंपावेतों बहुसंख्येनें असे अहिंसावीर बनले नाहींत, तोंपावेतों अशा बहुसंख्य सामान्यांनीं अन्यायाचा, दुष्टतेचा प्रतिकार अपरिहार्य तर प्रतिहिंसेनेंहि करावा, पण भ्याडाचें मरण पत्करूंच नये, अशी अनुमति आपद्-धर्म म्हणून, स्वतः निरपवाद अहिंसेचें परिपालन परमधर्म म्हणून कर-णाऱ्या, परंतु जनतेचे नेते या नात्यानें व्यवहाराचा विवेक व सूत्र जागरूकपणें सांभाळणाऱ्या, गांधीजीं-नीं दिलेली आहे. त्यांची जिवंत स्फूर्ति व उभ्या आयुष्याची उग्र तपश्चर्या भारतीयांना बहुसंख्येनें अहिंसा- वीर बनविण्यास असमर्थ ठरली, ही वस्तु-स्थिति लाजिरवाणी पण स्पष्ट आहे. त्यांच्या पश्चात् तर नैतिक मूल्यांच्याहि दृष्टीनें आपली पीछेहाटच चालूं आहे. आपल्या राष्ट्रपित्यानें ' स्वतंत्र भारत ' वारसाहक्कानें आपल्या स्वाधीन केला आहे. या स्वतंत्र भारताची अस्मिता व स्वातंत्र्य, भोंवतालच्या आक्रमक व हिंसक राष्ट्रांना स्वसामर्थ्यानें पुरून उरून, आपणांस टिकवावयाचें आहे; नव्हे, तें टिकविणें आपलें आद्य व पवित्र कर्तव्यच आहे.

---

## देव आणि दगड

आणि त्या पतितेवर साऱ्यांनीं आपले दगड रोंखले.

पतितेला आड करीत तो उदारचरित युगपुरुष म्हणाला : " ज्याचें मन निष्कलंक असेल त्यानेंच पहिला दगड मारावा. "

साऱ्यांनीं आपले हात आवरले. प्रत्येकाला मनोमन आपली खूण पटली होती.

परंतु द्वेष जळत होता. बाहू स्फुरत होते. पहिला दगड तर पडावयास पाहिजे होता.

" तर तूंच पहिला दगड टाक. पुढचें आम्ही पाहून घेतों " एकानें त्या युगपुरुषाला सूचना केली.

ही सोपी युक्ति सर्व जनसमुदायाला रुचली आणि तो पहिला दगड टाकीत नाहीं म्हणून साऱ्यांनीं ठेंचून ठेंचून त्याचाच बळी घेतला !

—देवदत्त दाभोलकर



अनुक्रमणिका






प्रा. प्र. रा. दामले

# न्या. मू. महादेव गोविंद रानडे

श्रेष्ठ ग्रंथांप्रमाणेंच श्रेष्ठ व्यक्तींचेंहि असें असतें कीं, प्रामाणिक अभ्यासकाला त्यांच्या मननानें नवनवा बोध व संतोष होत राहतो.

खरे नेमस्त ( Moderation किंवा प्राचीन ग्रीक आदर्शाप्रमाणें Temperance हा सद्गुण असलेली व्यक्ति ), खरे 'प्रागतिक' ( Liberal= जीवनाच्या सर्व प्रांतांत सुधारणा कशी करतां येईल याचा विचार करून ती घडवून आणण्याचा प्रयत्न करणारे ) व खरे 'पारमार्थिक '( High Piety या गुणानें युक्त ), असें ज्यांचें थोडक्यांत गुणवर्णन करतां येईल असें न्या. मू. रानडे यांची श्राद्धतिथि १६ जानेवारीस येत आहे. त्या निमित्तानें त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचें ओझरतें दर्शन आपल्या हल्लींच्या परिस्थितींत उद्बोधक ठरेल.

न्यायमूर्ति रानडे यांच्या जन्मदिनास १९४२सालीं शंभर वर्षें पुरीं झालीं, त्या वेळीं अनेक सभांमध्यें व अनेक लेखांमधून त्यांच्या विविध कार्यांचें दिग्दर्शन झालें व त्यांच्या अनेक बहुमोल गुणांबद्दल चर्चा केली गेली. त्याच्या आधीं व नंतर अनेक वृत्तपत्रांतून व मासिकांतून न्यायमूर्तींच्या व्यक्तिमत्त्वाचें गुणग्रहण केलें गेलें आहेच. श्री. रमाबाई यांचें " आमच्या आयुष्यांतील कांहीं आठवणी " तसेंच प्रा० न. र. फाटक यांनीं व इतरांनीं लिहिलेलीं चरित्रें, इंग्रजींतील प्रा. कर्वे यांचा Ranade, the Prophet of Modern India हा प्रबंध इत्यादि स्थळीं न्या. रानडे यांच्या मोठेपणाचें विवरण केलेलें आढळतें. तरीहि एक गोष्ट खरी कीं, रानडे यांना लोकमान्य टिळकांप्रमाणें चतुरस्र कर्तबगार निकटानुयायी व कुशल लेखक असा चरित्रकार अद्यापि मिळाला नाहीं. त्यामुळें जिवंत व आदरपूर्ण सहानुभूति व जिव्हाळा यांच्या योगानें त्यांचें जें व्यक्तिदर्शन होण्यासारखें आहे, त्यास महाराष्ट्र व हिंदुस्थान मुकला आहे. ना. गो. कृ. गोखले यांच्या कार्यव्यापृतत्वामुळें व अल्पायुष्यामुळें त्यांच्या हातून हें चरित्र लिहून झालें नाहीं. व त्यांच्यानंतर रानड्यांचा सर्वांगीण मोठेपणा समजून तो जिव्हाळ्यानें, जोमानें व आत्मविश्वासानें लोकांस समजावून देईल अशी व्यक्ति महाराष्ट्रांत तरी झाली नाहीं. कारण, एका अर्थी रानडे यांचें असामान्य व चतुरस्र श्रेष्ठत्व असें होतें कीं, विवेचक दृष्टीशिवाय त्याचें रहस्य कळणें कठिण आहे. रानडे यांच्या व्यक्तिमत्त्वाचे राष्ट्रभक्त व ईश्वरभक्त असे दोन अंश कल्पिले तर त्यांच्या विशिष्ट राष्ट्रभक्तीची व विशिष्ट ईश्वरभक्तीची पताका उत्साहानें, विश्वासानें व धैर्यानें मिरविणारी व्यक्ति निदान गोखल्यांनंतर कोणी झालीच नाहीं, असें म्हणावेसें वाटतें. रानडे व गोखले यांच्याबद्दलचा आदर व त्यांच्या मोठेपणाबद्दलची समजूत अलीकडे थोडी वाढत आहे, हें खरें. परंतु देशाला त्यांच्या चारित्र्यांतून व कार्यपद्धतींतून बोध घेणें किती अवश्य आहे, याचा विचार केल्यास यापेक्षां फार उत्साहानें, निष्ठेनें व प्रामाणिकपणें तें व्हावयाला पाहिजे आहे. माझ्या मतें याचा मुख्य दोष या महान् नेत्याच्या अनुयायांचा आहे.

तो दोष दोन प्रकारें दृष्टोत्पत्तीस येतो. प्रथम कांहीं दिवस त्यांच्या अनुयायांच्या कार्याचें स्वरूप, इतर मतें व संप्रदाय यांवर ( महाराष्ट्रांत टिळकपक्षीयांवर ) टीका, हें होतें. परंतु अलीकडे त्या कार्याचें स्वरूप निव्वळ निष्क्रियता असें झालें आहे.








आणखी एक चूक या नेत्याच्या अनुयायांकडून झाली असें वाटतें. ती ही कीं, त्यांच्या शिकवणुकीशीं अगदीं विसंगत अशी एक प्रकारची विभूतिपूजा त्यांनीं सुरू केली. तिचें स्वरूप असें कीं, रानडे किंवा गोखले यांच्या भूमिकांचें मर्म समजावून घेऊन त्यांचें तात्त्विक व डोळस पालन न करतां, त्यांचीं विशिष्ट मतें व भूमिका अक्षरशः प्रमाण आहेत, असें समजलें गेलें. अशा अनेक कारणांमुळें देशाच्या सर्वांगीण उन्नतीला या थोर नेत्यांचा त्यांच्या पश्चात् उपयोग होण्यासारखा होता तसा झाला नाहीं. खरोखरीं देशाला रानड्यांच्या उदारमतवादा-( Liberalism ) ची आजच्या इतकी केव्हांहि गरज नव्हती. असें असतांना त्याचा पुरस्कार करणारे प्रामाणिक व निष्ठावंत कार्यकर्ते नाहींत.—न्या. रानडे यांच्या जीवनक्रमांतील ठळक घटना वाचकांस माहीत आहेत असें गृहीत धरून त्यांचे जें व्यक्तिदर्शन प्रस्तुत लेखांत करण्याचें योजिलें आहे, त्यावरून वरील परिस्थिति स्पष्ट होईल.

न्यायमूर्ति यांच्या व्यक्तिमत्त्वाचा गाभा म्हणजे High Piety किंवा 'उच्च धार्मिक वृत्ति' असें म्हणतां येईल. त्याबरोबर असामान्य बुद्धिमत्ता व अविरत उद्योग त्यांच्या ठायीं असल्यामुळें अनेक क्षेत्रांत समाजोपयोगी रचनात्मक कार्यांचा पाया त्यांनीं घातला, व कार्याची दिशा दाखविली. प्रथम त्यांच्या धार्मिक वृत्तीचें विवेचन करूं. "धार्मिक वृत्ति" हे शब्द पुष्कळ आधुनिक लोकांना चमत्कारिक व मागसलेल्या दृष्टिकोनाचे वाटतील. तसे ते नाहींत व निदानपक्षीं न्यायमूर्तींना ते तसे वाटत नव्हते. हा सर्व संसार, वैयक्तिक व सामाजिक जीवन, हें ईश्वरप्रणीत आहे; त्यांत कांहीं कल्याणमय सूत्र आहे; व आपलें सर्व आचरण, सर्व उद्योग या मूलभूत विश्वासावर आधारलेले असावेत, असें त्यांना वाटे. धार्मिक मनुष्य इतर सत्प्रवृत्त व्यक्तींच्या तुलनेनें कांहीं प्रकारें कमी आग्रही असतो व वर वर पाहाणारास तें त्याचें दौर्बल्य वाटतें. वस्तुस्थिति मात्र उलट असते. ध्येयवाद ही गोष्ट सुद्धां अहंभावाचें उदाहरण होऊं शकतें व म्हणून नेहमीं "असें-असेंच झालें पाहिजे" हा अत्यंतिक आग्रह कोणाहि ईश्वरपरायण व्यक्तीला योग्य नव्हे. धार्मिक वृत्तीला बुद्धिनिष्ठ समजूतदारपणाची जोड मिळाल्यानें रानडे यांचें वर्तन बुद्ध्या 'नेमस्त' असे व त्यामुळें अनेकांची त्यांजवर इतराजी होई. रानडे यांनीं सरकारी नोकरी न धरतां चिपळूणकर, आगरकर, टिळक, गोखले, यांच्याप्रमाणें देशसेवा केली असती तर त्यांचें कार्य कांहीं अर्थीं साहजिकच अधिक परिणामकारक झालें असतें. परंतु एकनाथांनीं उत्तम संसार केला, सॉक्रेटीस, तुकाराम, गांधी यांनींहि संसार सोडला नाहीं, याचें मर्म लक्षांत घेतलें तर रानडे यांनीं नोकरी कां सोडली नाहीं याचें मर्म कळतें. रानडे यांच्या काळांत जी परिस्थिति होती ती नंतरच्या परिस्थितीच्या मानानें वेगळी होती. रानडे यांनींच नव्हे, तर लोकहितवादी, जांभेकर यांच्यासारख्या इतरहि अनेक देशहिताकांक्षी व्यक्तींनीं नोकरींत राहूनच देशसेवा केली. परंतु रानडे यांचा स्वभाव व वृत्ति लक्षांत घेतली तर प्राप्त परिस्थितीमध्यें कौटुंबिक जबाबदाऱ्या पार पाडणें, आईवडिलांना व इतर आप्तांना सुख देणें, त्याचबरोबर होईल ती समाजसेवा करणें, अशीच त्यांची भूमिका असणार. विधवाविवाह मान्य करून वडिलांच्याकरितां कुमारिकेशीं लग्नास कबूल होणें, स्वतःचा प्रत्यक्ष संबंध नसतां मित्राकरितां प्रायश्चित्त घेणें, या व अशा गोष्टी त्यांनीं कमकुवतपणामुळें केल्या नसून बुद्धिपूर्वक केल्या. एका अर्थीं सुधारणेच्या नेत्याला या शोभण्यासारख्या नाहींत, हें खरें; परंतु नेता होऊं शकलों नाहीं तरी चालेल, पण सुधारणेच्या कार्याला आपल्या परिस्थितींत योग्य व शक्य ती मदत करूं असा विनयपूर्ण निश्चय कोणी घेतला तर त्यास कमी धैर्य किंवा स्वार्थत्याग लागतो, असें नव्हे.

हा संसार, सर्व मानवी इतिहास 'ईश्वरप्रेरणे'नें घडत असतो असा रानड्यांचा विश्वास, ब्रिटिश राजवटीनें ब्रिटिशांशीं आलेला हिंदुस्थानचा संबंध हें एक Divine Dispensation आहे असें ते म्हणत, यावरून स्पष्ट होतो. त्यांच्या म्हणण्याचा योग्य अर्थ मात्र फारच थोड्यांना समजला, असें दिसतें. हिंदुस्थानसारख्या प्राचीन संस्कृतीच्या देशाचा एका दूरच्या पाश्चात्य राष्ट्राशीं जेते आणि जित असा जो निकट व दुःखदायक संबंध आला, त्यास हिंदी जनतेची शास्त्रीय ज्ञानाविषयीं



अनुक्रमणिका







अनास्था इत्यादि अनेक दोष कारणीभूत होतेच. परंतु त्याबरोबरच या उत्पन्न झालेल्या परिस्थितींत विचारपूर्वक व्यवहार झाल्यास, इंग्लंडसारखा लोकशाही, समजूतदार, नेकीच्या राष्ट्राशीं संबंध येणें या घटनेंतून सर्वांगीण लाभहि होण्यासारखा होता. पूर्व व पश्चिम जग एकत्र झालें आहे म्हणून दोघांनीं एकमेकांपासून शिकावें व आपापल्या जीवनास परस्परांच्या सहकार्यानें पूर्णता आणावी, हा टागोरांचा संदेश अंतर्मुख कविमनाच्या भूमिकेवरून दिला गेला. रानड्यांनीं ऐतिहासिक, व्यावहारिक व बुद्धिनिष्ठ त्याचबरोबर ईश्वरनिष्ठ व अंतर्मुख अशा दृष्टिकोनांतून यासंबंधींचा अर्थ वर सांगितल्याप्रमाणें लावला. त्यांत ब्रिटिशांची अवास्तव स्तुतिहि अभिप्रेत नव्हती. प्राप्त परिस्थिति उत्तम आहे, यावच्चंद्रदिवाकरौ ती कायम राहावी असें त्यांचें प्रतिपादन नव्हतें. उलट, विचारवंतांना सुद्धां ब्रिटिशांच्या लष्करी सामर्थ्याच्या व राजकारणपटुत्वाच्या तुलनेनें आपले दोष व मागसलेली स्थिति पाहून जी निराशा वाटेल तिचें त्यांत निराकरण करावयाचा एक मार्ग रानड्यांनीं दाखविला होता. विपत्कालीं जो चित्ताचें समाधान राखूं शकतो, तोच हातपाय हालवूं शकतो. असें समाधान वस्तुस्थितीकडे भावनावशतेनें पाठ फिरवून नव्हे तर खंबीर बुद्धीनें वस्तुस्थितीला तोंड देऊन मिळविण्यास खरी प्रतिभा लागत असते. ही अमूल्य उच्च प्रतिभा ईश्वरनिष्ठेंतून उगम पावते. अशा प्रकारची ईश्वरनिष्ठा आणि प्रतिभा रानड्यांना लाभलेली होती.

टिळकांनीं रानड्यांवरील मृत्युलेखांत वर्णन केल्याप्रमाणें, निर्जीव थंडगार होऊन पडलेल्या आपल्या देशाला ऊब आणून चेतनायुक्त व कार्यप्रवृत्त करण्याचें थोर कार्य रानड्यांनीं केलें. त्यांच्या कार्याची रूपरेषा सर्वव्यापी होती. अलीकडे गांधीजींनीं राजकारणाचा जसा व्यापक अर्थ केला तसाच निराळ्या प्रकारानें रानड्यांनीं केला. त्या दोघांत मुख्य फरक असा कीं, रानडे यांचा पिंड विद्वानाचा व बुद्धिवंताचा होता. गांधीजी कार्यप्रवण होते. गांधी स्वतः नीति व धर्म यांमधून राजकारणाकडे वळले. परंतु व्यक्ति म्हणून गांधीजी जरी धार्मिक असले तरी त्यांचें राजकारण धर्मनिष्ठ होतें, असें दिसत नाहीं. रानडे यांची धर्माची व्याख्या व्यापक होती. त्यांचें सर्वच सामाजिक कार्य खऱ्या अर्थीं धार्मिक होतें. गांधीजींना जें राजकारण पाहिजे होतें तें रानडे प्रत्यक्ष करीत. समाजसुधारणा, धर्म-सुधारणा, राजकीय सुधारणा, आर्थिक जीवनांतील प्रगति, सर्वच त्यांनीं आरंभिल्या व त्या सर्व एका समाजजीवनाचे परस्परनिगडित भाग म्हणून. ना. गोखल्यांनीं डेक्कन एज्युकेशन सोसायटीचा निरोप (' Farewell to D. E. Society ') घेतांना केलेल्या भाषणांत, डी. ई. सोसायटीचे किंवा पुढें निघालेल्या 'भारत सेवक-समाजाचे कार्यकर्ते हे धर्मनिरपेक्ष ( Secular ) ध्येयवादाकरितां मिशनरी वृत्तीनें काम करतात, असें म्हटलें. ती भूमिकाहि रानड्यांना अभिप्रेत नव्हती. कारण, ऐहिक किंवा धर्मनिरपेक्ष (Secular) व आध्यात्मिक ( Spiritual ) असे जीवनाचे दोन विलग भाग होऊं शकत नाहींत हा नैतिक व धार्मिक तत्त्वज्ञान्यांचा मुख्य सिद्धान्त त्यांनीं आत्मसात् केला होता.

रानड्यांनीं समाजकारण, राजकारण, अर्थकारण व इतिहास यांविषयीं अभ्यासपूर्वक प्रकट केलेल्या विचारांचा एकत्र विचार करण्यासारखा आहे. त्यांच्या समाजसुधारणाकार्याचें वैशिष्ट्य त्यांची खरी सहिष्णुता व सामोपचारबुद्धि यांत आहे. आगरकरांसारख्या प्रामाणिक व आग्रही समाजसुधारकाची रानड्यांच्या (—त्र रानडे त्या वेळीं सर्व महाराष्ट्रीय कार्यकर्त्यांचे मान्यवर नेते होते—) या दृष्टिकोनानें कुचंबणा होई व क्वचित् ते आपलें असमाधान व्यक्तहि करीत. परंतु रानड्यांचा मार्ग थोडा कंटाळवाणा वाटला तरी अधिक श्रेयस्कर होता. ज्या समाजाला आपणांस वळण लावावयाचें आहे, त्याला बरोबर घेऊन अधिकांत अधिक कार्य केल्यास तें टिकतें व त्याचा फैलाव होतो; समाज कार्यकर्त्याकडे सहानुभूतीनें व आपलेपणानें बघूं लागतो. म्हणून अगदीं नाइलाज नसेल तर दोरी न तुटेल अशीच जुन्या आचारांशीं रस्सीखेंच करावयाची, अशी रानड्यांची कार्यपद्धति होती. पंचहौद मिशनमधील व्याख्यानाच्या वेळीं चहा घेतल्याच्या आरोपाबद्दल शंकराचार्यांपुढें जी चौकशी झाली, त्यांत भाग घेणें व कैफियत देणें ( विशेषतः








टिळकांसारख्या चाणाक्ष प्रतिपक्ष्याबरोबर!) हें पुष्कळांना आवडलें नाहीं. व त्यांत गुंतलेल्या आपल्या स्नेह्याच्या खातर प्रायश्चित घेणें यानें तर रमाबाईंना-सुद्धां धक्का बसला. परंतु विचार केला तर रानड्यांनीं घेतलेली भूमिकाच त्यांच्या स्वतःच्या वैयक्तिक दृष्टीनेंच नव्हे तर समाजसुधारणेच्या कार्याच्या यशाच्या दृष्टीनेंहि योग्य होती, हें लक्षांत घेण्यासारखें आहे. आपल्या समाजांतील सुधारणेचें कार्य तितकें समाधानकारक झालें नाहीं. याचीं दोन कारणें दिसतात. पहिलें व जें सर्वांना समजण्या-सारखें आहे तें असें कीं, प्रामाणिक समाज-सुधारक फार थोडे झाले आहेत. बोलणें फार; करणें थोडें, अशी बहुधा स्थिति होती व आहे. दुसरें कारण असें कीं, जे थोडे प्रामाणिक कार्यकर्ते होते त्यांत अनेक लोक 'असहिष्णु' होते व आहेत. त्यांनीं समाजांतील सर्वसाधारण व्यक्तींचा आपलेपणा गमाविला व त्यामुळें सुधारणेस असलेला विरोध बळकट झाला. टिळकांच्या समाजसुधारणेविषयींच्या वरवर दिसणाऱ्या प्रतिगामी भूमिकेंत सत्याचा अंश होता तो हाच. रानड्यांचा मोठेपणा हाच कीं त्यांची कार्यपद्धति इतकी सौजन्यपूर्ण व सहिष्णु होती कीं, वैरी देखील मित्र व्हावा. जुना सनातनी समाज हा सुधारक-कार्यकर्त्यांचा वैरी नसून तोच सुधारक कार्यकर्त्यांचें कार्यक्षेत्र—व अंतीं सामर्थ्यहि—आहे, हें रानडे ओळखीत व तसें वागत. समाजसुधारणेच्या कार्यांत परकीय सरकारला हात घालूं देऊं नये, ही टिळकांची भूमिका रानड्यांस मान्य नव्हती. ती वादग्रस्त आहे व प्रस्तुत स्थलीं त्याचा विचार करणें अवश्यहि नाहीं.

आपल्या व इतर देशांच्या इतिहासाचें मार्मिक व निःपक्षपाती परंतु सहृदय अवलोकन; राजकीय सत्तेचा मुख्य उपयोग म्हणजे सामान्य नागरिकाचें आर्थिक जीवन सुधारणें व त्यास स्वावलंबी व कार्य-प्रवृत्त करणें, ही जाणीव; व राजकीय चळवळींत शाब्दिक कलहांत वेळ व शक्ति न घालवणें;—या तीन गोष्टी रानड्यांनीं मनांत बाळगल्या व त्या लोकांस शिकविण्याचा प्रयत्न केला. स्वराज्य म्हणजे काय, तें कशाकरितां मिळवावयाचें व तें मिळाल्यास टिक-विण्यास काय तयारी करावयास पाहिजे, हें रानडे, गोखले यांच्या राजकारणावरून कळतें व तें न शिकल्यामुळेंच स्वराज्यानंतरहि हिंदी जनता व तिचे नेते इतके भांबावून गेले आहेत. राजकीय कार्याबद्दल टिळक, रानडे व गोखले यांचे मूलभूत भेद नव्हते. दोन्हीही पक्ष सनदशीर मार्गानें जाणारे ( Constitutional ), रचनात्मक होते व त्यांत तरतम भाव लागण्यासारखा असला तरी तो लावण्यानें आतां विशेष उपयोग नाहीं. रानड्यांच्या राजकारणविषयक कार्यपद्धतीचा एक मुख्य विशेष असा कीं, कोठल्याहि राजकीय प्रश्नासंबंधीं मतप्रदर्शन, जागृति, किंवा चळवळ करण्यापूर्वीं त्याबद्दल पूर्ण माहिती मिळवून त्या प्रश्नाचा सर्वांगीण विचार करणें. ना. गोखले यांनीं आपल्या आमदनींत निरनिराळ्या प्रश्नांवर या देशांतील वरिष्ठ विधि-मंडळांत व परदेशांत जीं भाषणें केलीं, जें लेखन केलें, तीं वाचलीं असतां देशाभिमानाची चळवळ भावनावशतेनें व आत्यंतिक शब्दांत न करतां सभ्य, सौजन्यपूर्ण व पूर्ण माहितीवर आधारलेल्या शब्दांत त्यांनीं कशी केली, हें दिसतें. गोखल्यांस ही शिक-वण न्यायमूर्तींकडून मिळाली. रानडे यांचे लेख, व भाषणें वाचलीं तर आपण अतिशय तात्त्विक व व शास्त्रीय परंतु सहृदय मनाच्या दृष्टिकोनांतून त्या त्या प्रश्नाचा विचार करूं लागतों. आर्थिक व औद्योगिक परिषदा, सार्वजनिक सभेचें जर्नल यांतून महाराष्ट्रीयांचा इतिहास, वाङ्मय व धर्म यांवरील त्यांचें लिखाण व भाषणें गंभीर भावनेनें भारावलेलीं असूनहि समतोल आणि माहितीपूर्ण आहेत. टिळकहि आपल्या परीनें व प्रकारें याच पद्धतीचा अवलंब करीत हें त्यांचें व केळकर, खाडिलकर यांचें लिखाण पाहिलें तर स्पष्ट दिसेल. गांधीयुगांत ही पद्धत मागें पडली व त्याचे परिणाम स्वराज्यांत भोगावे लागत आहेत.

रानड्यांच्या धर्मविषयक कार्याचा थोडा विचार केल्यास त्यांच्या कामगिरीचें, व्यक्तिमत्त्वाचें वैशिष्ट्य अधिक लक्षांत येईल. ब्रिटिश आमदनीच्या प्रारंभीं हिंदी समाज अनेक प्रकारच्या निकृष्टावस्थांत होता. रानडेप्रभृति विचारवंत नेत्यांच्या लक्षांत आलें कीं, अत्यंत प्राचीन संस्कृति व धर्मजीवन असलेला हा समाज त्या क्षेत्रांतहि फार मागसलेला होता. म्हणून

## न्या. मू. महादेव गोविंद रानडे

खऱ्या धर्माचें जीवन कसें जगावें याचें उदाहरण घालून देण्याचा त्यांनीं प्रयत्न केला व ती शिकवण लोकांस दिली. अंधश्रद्धा, मतामतांचा गलबला, अप्रामाणिकपणा या दोषांनीं आपलें धार्मिक जीवन अत्यंत गढूळ झालें होतें. म्हणून ते दोष काढून टाकून ईश्वरभक्ति कशी करावी याचें त्यांनीं दिग्दर्शन केलें. ब्राह्मसमाज हा हिंदुधर्माचेंच सुधारलेलें स्वरूप म्हणून उदयास आला व महाराष्ट्रांत रानडे, भांडारकर, चंदावरकर यांसारख्या लोकाग्रणींनीं ब्राह्मसमाजाची (प्रार्थनासमाजाची) स्थापना केली व तो निष्ठेनें चालविला. त्या कार्याला प्रत्यक्ष फळ फारच थोडें आलें असें दिसतें. त्या समाजाचे सभासद मुंबई–पुणें यांसारख्या शहरांच्या बाहेर तर नाहींतच पण तेथेंहि फार थोडे आहेत. साहजिकच, साप्ताहिक उपासना व वार्षिक उत्सव यांपलीकडे धर्मजागृतीचें काम त्यांच्याकरवीं फारसें होत नाहीं. तरी पण आपला समाज खरोखर प्रगतिपर व्हावयाचा असेल तर ब्राह्मसमाजाकडे किंवा तत्सम हिंदु धर्माच्या नव्या अवताराकडे अधिक लक्ष दिल्याशिवाय चालावयाचें नाहीं. माणसाचें सर्व व्यवहारांतील यश त्याच्या आचरणावर, त्याच्या शक्तीवर, व श्रद्धेवर अवलंबून असतें. तें शील किंवा श्रद्धा घडविण्यास धर्माइतकें प्रभावी कारण दुसरें कोणतेंहि नाहीं.

रानडेप्रभृति नेत्यांच्या या क्षेत्रांतील अनुयायांनीं रानड्यांनीं स्थापिलेल्या या धर्मजागृतीच्या संस्थेच्या कार्यास जोर येईल असें काय केलें आहे, याबद्दल विचार करण्यासारखा आहे. मुख्य गोष्ट अशी दिसते कीं, रानडे यांनीं दाखवून दिलेल्या इतर दिशांप्रमाणें याहि दिशेस सर्वस्वीं वाहून घेतलेले कार्यकर्ते हवेत. पाश्चात्य समाजांत चर्चचे सेवक ज्याप्रमाणें व ज्या प्रकारें करतात त्या निष्ठेनें कार्य केल्याशिवाय खऱ्या धर्माचें पुनरुज्जीवन होणार नाहीं. दुसरी महत्त्वाची गोष्ट अशी कीं, रानडेप्रभृतींनीं ही सुधारणा आरंभिली तेव्हां साहजिक त्यांना समाजांतील प्रचलित अंधसमजुतींशीं आपला मतभेद स्पष्टपणें दाखवावा लागला. परंतु त्यांतहि रानड्यांनीं संग्राहक व सामोपचारी वृत्ति दाखविली. हिंदुधर्माचें पुनरुज्जीवन असा जर ब्राह्मसमाज आहे तर सामान्य हिंदु जनतेला अनोळखी वाटणार नाहीं अशा रीतिरिवाजांचा उपयोग करून त्यांची सुधारणा केली पाहिजे. राजकारणाप्रमाणेंच धर्मकारणहि नेत्यांचें किंवा नेत्याकरितां नसून समाजाकरितां असतें. त्यांतच खरी प्रगति आहे. शाब्दिक मतभेदांकडे दुर्लक्ष करून अजूनहि पंढरीच्या वारींत जाणाऱ्या लक्षावधि लोकांची धार्मिक भावना नव्या भागवत–धर्माकरितां उपयोगी आणण्याला कल्पनाशक्ति व सहृदयता पाहिजे. हे गुण व ही निष्ठा असल्यास समाजाच्या कार्यास अजूनहि तेज येईल व राष्ट्राच्या हिताची फार मोठी कामगिरी त्याच्याकडून होऊं शकेल.

रानड्यांचें राजकारण गोखल्यांनीं उत्तम चालविलें. परंतु गोखल्यानंतर महाराष्ट्रांतच नव्हे तर अखिल हिंदुस्थानांत त्यांच्या निष्ठेचा, कर्तबगारीचा ध्येयवादी पुढारी प्रागतिक (Liberal) पक्षास मिळाला नाहीं. कॉंग्रेस पक्षापेक्षां या पक्षांत स्वार्थत्याग कमी लागे. सरकारच्या इतराजीची भीति कमी. म्हणून पुष्कळ लोक आपल्यास या पक्षाचे अनुयायी म्हणवीत असत. परंतु देशाच्या कल्याणाची काळजी क्षणोक्षणीं वाहून त्याकरितां अविरत श्रम करणें, याला खरें धैर्य व त्याग लागत असतो. त्यांत प्रागतिक पक्ष इतर कोणा पक्षापेक्षां कमी असूं शकत नाहीं, याची जाणीव त्या पक्षांच्या नेत्यांनाहि पुरेशी दिसली नाहीं. स्वार्थत्यागाच्या भूमिकेवरून चालविलेल्या म्हणून गाजलेल्या डी. ई. सोसायटीपेक्षांहि कडक स्वार्थत्याग गोखल्यांनीं काढलेल्या 'भारतसेवक समाजां'चे सभासद करितात व म्हणूनच ना. शास्त्री, कुंझरू, ना. म. जोशी यांचीं नांवें विरोधी पक्षांतहि नेहमीं आदरणीयच वाटत आलीं आहेत. पण 'भारतसेवक समाजा'च्या बाहेर प्रागतिक पक्षांचे नेते व अनुयायी यांनीं पक्षाच्या मोठेपणांत भर पडेल अशी खबरदारी घेतली नाहीं, असेंच म्हणणें भाग आहे. या पक्षाच्या स्वार्थत्यागी नेत्यांनींहि एका महत्त्वाच्या बाबतींत प्रायः चुकीचें धोरण ठेवलें असें वाटतें. ती बाब म्हणजे रानडे-गोखल्यांपासूनच आतांपर्यंत कालमान व परिस्थिति किती बदलली आहे हें लक्षांत घेऊन त्यांच्या राजकारणाचीं तत्त्वें अबाधित ठेवून तपशिलांत योग्य










बदल केला पाहिजे, हें लक्षांत ठेवलें नाहीं. तसें झालें असतें तर मजूरचळवळीचा योग्य पुढाकार त्यांना घेतां आला असतां. ना. म. जोश्यांसारख्या कार्यकर्त्यांस सोसायटीच्या बाहेर जावें लागलें नसतें व आजचे सोशॅलिस्ट व लिबरल यांचा मिळून एक महत्त्वाचा पक्ष निर्माण होऊन कॉंग्रेसच्या राजवटींत होत असलेल्या अनेक दोषांचा आविष्कार व परिमार्जन करण्यास तो समर्थ झाला असता.

रानड्यांच्या वैयक्तिक जीवनाचा जर थोडा विचार केला तर, त्यांच्या मोठेपणाचें बीज कशांत होतें, हें लक्षांत येईल. आपल्या वडिलांच्याबद्दल त्यांचा असलेला आदर व प्रसंगीं आपणांस थोडा कमीपणा आला तरी त्यांस न दुखविण्याची तत्परता हे रानड्यांचे गुण अनेक प्रसंगीं—विशेषतः त्यांच्या द्वितीय विवाहाच्या प्रसंगीं—दिसले. याचा अर्थ रानडे यांनीं आपली भूमिका सोडली असें नसून वडिलांस न दुखवितां जेवढी सुधारणा शक्य होती तितकी त्यांनीं केली. कोल्हापुरांत न्यायदानाच्या बाबतींत वडिलांच्या ओळखीनें कोणी आप्त खाजगी भेटीसाठीं आला, तेव्हां त्याला त्या वेळीं न दुखवितां, नंतर मात्र वडिलांस त्यांनीं स्पष्ट सांगितलें कीं, अशानें मला कोल्हापूराहून बदली करून घ्यावी लागेल. रमाबाईच्या 'आठवणीं'त लग्नानंतर त्यांच्या शिक्षणाचा प्रारंभ कसा झाला व त्या कामीं रानडे यांनीं आपल्या भगिनीचें मन सांभाळूनहि रमाबाई यांस कशी अहर्निश मदत केली व सुविद्य आणि सुसंस्कृत होण्यास कसें शिकविलें, याचे जागोजागीं उल्लेख आहेत. वडिलांना न दुखवितां आपल्या सहधर्मचारिणीबद्दलचें सर्व कर्तव्य त्यांनीं किती कसोशीनें पाळलें व पत्नीस कसें सुख दिलें, हें 'आठवणी' पदोपदी सांगतात. कुटुंबांतील ज्येष्ठ माणसांचा संतोष ही व्यक्तीच्या खऱ्या यशाची व ध्येयवादित्वाची महत्त्वाची कसोटी होय, हें रानडे नेहमीं समजत व आचरीत. आपल्या कुटुंबियां-प्रमाणें आपल्या स्नेह्यांबद्दलहि ते फार कनवाळू होते. श्री. शं. पां. पंडित यांचा त्यांचा स्नेह व एका गृहस्थाकरितां सर्वांचा रोष पत्करून त्यांनीं पंचहौद मिशन प्रकरणीं शेवटीं प्रायश्चित घेतलें ही गोष्ट—हीं दोन उदाहरणें हेंच दाखवितात कीं, खरा मोठा मनुष्य सर्वच बाबतींत थोर असतो. कुटुंबांतील नोकरांबद्दलही त्यास किती समता वाटे, त्यांचीं दुःखें किती सहानुभूतीनें ते स्वतः अनुभवीत, याचेंहि वर्णन 'आठवणीं'त सांपडतें. तात्पर्य, 'प्रपंच करावा नेटका' या उक्तीचें उत्तम उदाहरण रानड्यांच्या जीवनांत सांपडतें व अशा प्रपंचावरच खरा परमार्थ उभारतां येतो, हें त्यांनीं आपल्या आचरणानें दाखविलें.

रानड्यांच्या कार्याचें आणखी एक महत्त्वाचें क्षेत्र न्यायदानाचें होय. मुंबई हायकोर्टांत जे पहिले दोन-तीन हिंदी न्यायाधीश नेमले गेले त्यांतील एक रानडे होत. केवळ आपल्या कर्तबगारीनें, सरकार-दरबारीं सार्वजनिक कार्यामुळें कांहींसा रोष असतांहि, ते या उच्च पदीं चढले. न्यायाधीश म्हणून विद्वत्ता, सखोल विचार, निरलसता व निःपक्षपातित्व यांबद्दल त्यांची ख्याति होती. त्या-वेळच्या सरन्यायाधीशांस व इतर इंग्लिश व हिंदी सहकारी न्यायाधीशांस त्यांच्याबद्दल फार आदर असे. आपल्या क्रमप्राप्त सहज अशा कौटुंबिक कर्तव्या-प्रमाणेंच स्वीकृत न्यायदानाचें कर्तव्यहि योग्य रीतीनें पार पाडूनच ते सार्वजनिक कार्यांत भाग घेत. असा हा थोर पुरुष आपल्या देशाच्या निकृष्टावस्थेंतहि आपणांमध्यें होऊन गेला, हें आपलें भाग्य होय. महाराष्ट्रीयांना चिरकाल अभिमान वाटण्या-सारखी गोष्ट ही कीं, आधुनिक हिंदुस्थानचे प्रणेते म्हणतां येतील असे तीन पुरुष तरी महाराष्ट्रीय होते. ते म्हणजे रानडे, टिळक व गोखले. इतरहि अनेक थोर पुरुष निरनिराळ्या क्षेत्रांत झाले; परंतु या तीन व्यक्तींनीं सुशिक्षित महाराष्ट्रावर जे उपकार केले, त्यांस सीमा नाहीं. रानड्यांचें खरें पुण्यस्मरण हेंच कीं, आजच्या काळांत महाराष्ट्र देशोद्धाराच्या कामीं पुन्हां नेतृत्व कसें मिळवूं शकेल याचा विचार व प्रयत्न करणें. स्वराज्य म्हणजे काय, तें कां मिळवावें, व टिकवावें कसें, याचा विचार त्यांनीं उत्तम केला होता. तो लक्षांत घेऊन पाऊल टाकल्यास महाराष्ट्र पुनः निर्विवाद अग्रभागीं येईल.

टिळक व रानडे या दोन थोर व्यक्तींची तुलना केली तर असें लक्षांत येतें कीं, टिळक व रानडे यांची बुद्धिमत्ता व कर्तबगारी असामान्य










# न्या. मू. महादेव गोविंद रानडे

होती. ज्यांना अवतारी पुरुष म्हणतात असे ते होते. त्यांची कार्यपद्धति भिन्न होती. पण असामान्यत्व सारखें होतें. त्या दोघांनाहि एकमेकांच्या मोठेपणाची जाणीव होती. रानडे हे आपल्या अनुयायांची टीका सोसूनहि टिळकांबद्दल आपलेपणा व आदर दाखवीत. टिळक रानड्यांबद्दल सकृद्दर्शनीं अनादराचे उद्गार काढीत; तरी पण मनांत त्यांना फार मानीत. टिळकांनीं रानड्यांवर लिहिलेल्या मृत्युलेखांत जशी त्यांची थोरवी वर्णन केली आहे, तशी रानड्यांच्या अनुयायांनाही प्रायः करतां आली नाहीं.

वरील विधानाला एकाच अनुयायाचा अपवाद करावयास हवा तो म्हणजे रानडे यांचे प्रिय शिष्य व प्रागतिक पक्षाचे अभूतपूर्व नेते गोखले. गोखले स्वभावानें व वृत्तीनें गांधीजींना जवळ. बुद्धिमान् परंतु भावनानिष्ठ. रानड्यांच्या व्यक्तिमत्त्वापैकीं तात्त्विक व धार्मिक भागांचा गोखल्यांवर तितका पगडा बसला नाहीं. ते विशेषतः राजकारणी होते व त्यांत टिळकांसारखे होते. पण राजकारणाची पद्धत ते रानड्यांपासून शिकले. रानडे-गोखले ही गुरुशिष्यांची जोडी अर्वाचीन भारतीय सार्वजनिक जीवनांत अपूर्व अशी व प्राचीन भारतांतील गुरुशिष्यांच्या आठवणींस उजळा देण्यासारखी होती. टिळक–केळकर, गांधीजी–नेहरू यांपेक्षांहि रानडे–गोखले हा गुरुशिष्यसंबंध अधिक खरा आहे. रामकृष्ण–विवेकानंद या पारमार्थिक गुरुशिष्यसंबंधाशीं रानडे–गोखले यांच्या गुरुशिष्यत्वाची तुलना करण्या-सारखी आहे. टिळक व गोखले यांचे मतभेद प्रसिद्ध आहेत. गोखले हळवे असल्यानें टिळकांची तीक्ष्ण टीका त्यांना फार दुखवी. परंतु टिळक–गोखले यांनाहि एकमेकांच्या कर्तबगारीची योग्य जाणीव होती. ' Born a few centuries ago he would have carved out an empire for himself ' असें गोखले टिळकांविषयीं म्हणत. 'सार्वजनिक जीवनाची ओढ मला टिळकांनींच लावली' असेंहि म्हणत. गोखल्यांवरील भाषणांत टिळक म्हणतात :" वैभव व यश आपण सहज मिळवूं अशी उमेद असूनहि त्याच्याकडे पाठ फिरवून देशसेवेचें कठिण व्रत अंगीकारणें व त्याकरितां अविरत श्रम करणें यांतच गोपाळरावजींचें मोठेपण आहे." टिळक उत्तम नेते तर गोखले आदर्श शिष्य आणि रानडे द्रष्टे ऋषि असें या थोर व्यक्तींचें वैशिष्ट्य वर्णन करतां येईल.

टिळक, रानडे व गोखले यांचे अनुयायी म्हणविणारांनीं आपआपलीं मतें न सोडतां सहकार्य करणें शक्य व अवश्य आहे. आजच्या परिस्थितींत त्यांचे मतभेद क्षुल्लक असून त्यांचें साम्य पुष्कळ अधिक आहे, हें लक्षांत यावें. इतकेंच नव्हे तर गांधीजींचे खरे अनुयायी असतील (–तसे फार दिसत नाहींत.–) त्यांच्याशीहि त्यांना पुष्कळ सहकार्य करतां येईल व तें करण्याची आवश्यकता आहे. या सर्व थोर राष्ट्रपुरुषांचें योग्य अनुकरण करून राष्ट्रकार्यास मदत केली तरच आजचे बिकट प्रश्न सुटतील.

---

## योगी अरविन्द आणि सरदार वल्लभभाई

जीवनाची आध्यात्मिक पातळी उंच करण्याचा प्रयत्न करणाऱ्या ध्यानयोगी विचारकाची किंवा तत्त्वचिंतकाची सेवा अव्यक्त किंवा अप्रकटच राहते. त्याउलट लोकजीवन सुखी बनविण्याकरितां आणि समाजाच्या समोरील समस्या सोडविण्याकरितां आपलें जीवन व्यतीत करणाऱ्या कर्मयोगी समाजसेवकाची सेवा व्यक्त किंवा प्रकट रूपानें दिसून येते.—अशा अत्यंत भिन्न प्रकृतीचे असलेले आपले दोन उपकार-कर्ते ( सुमारें ) एका आठवड्याच्या अंतरानें आपणांस सोडून गेले आहेत.

—आचार्य विनोबा
' सर्वोदय ' ' १५–१२–५० '








प्रा. त्र्यंबक शंकर शेजवलकर

# मध्यप्रदेशांतील मराठ्यांच्या इतिहासाची अनास्था

[1]मानवप्राणी पशूंतून उन्नत होत आलेला आहे. पशूंपेक्षां त्याला बोलण्याची व स्मरणशक्तीची देणगी अधिक आहे. जर माणसाला मागील गोष्टींचें स्मरण राहत नसेल तर तो सहजच पुनः पशुकोटींत अवनत होईल. आपण ज्याला ज्ञान म्हणतों तें म्हणजे वस्तुतः माणसानें केलेल्या गोष्टींचें पद्धतशीर लिहिलेलें वर्णनच असतें. या दृष्टीनें पहातां सर्व ज्ञान म्हणजे इतिहासच आहे. रसिक साहित्यिक 'साहित्य-संगीतकलाविहीनः साक्षात्पशुः पुच्छविषाणहीन : ।' हें सुभाषित माणसांचा पशूंपासून भेद दाखवितांना म्हणतात. पण त्याहून, ज्याला मागें घडलेल्या गोष्टींचें स्मरण नाहीं, तोच पशु असें म्हणणें जास्त विचाराचें ठरेल व सत्य तर खासच आहे.

## माणुसकी इतिहासानें घडविली

ज्ञानासाठीं ज्ञान असें उच्च दृष्टीनें म्हणण्यांत येतें, पण त्यापेक्षां माणुसकीसाठीं ज्ञान असेंच खरोखरीं म्हटलें पाहिजे. कारण माणुसकी ही वस्तु एकदम माणसाला ईश्वरानें देणगी म्हणून दिलेली नसून तीहि इतिहासानें उन्नत होत आलेली गोष्ट आहे. महाभारतकालीं ज्याला माणुसकी म्हणत, त्याला आजचे लोक माणुसकी म्हणतीलच असें नाहीं. हा भेद काळच घडवीत आलेला आहे. माणसांचीं ध्येयें, जास्त जास्त ज्ञान संगृहीत होत गेलें, तसतशीं त्या ज्ञानाच्या अनुरोधानें बदलत गेलीं. अति-प्राचीन काळीं ज्याला शूरपणा म्हणत, तो कदाचित् आज रानटीपणा समजला जाईल. युद्ध हें शत्रु मारण्यासाठीं असतें, पण त्याला कसें मारावें याचेहि नियम महाभारतकालापासून उन्नत होत आलेले दिसतात. ते नियम मोडणारे लोक माणूस समजले जात नाहींत. अमेरिकन लोकांनीं पांच वर्षांपूर्वीं इंग्लंड व रशिया या दोस्त-राष्ट्रांच्या संमतीनें जपानी लोकांवर ॲटम बॉंब टाकून त्यांना एका आठवड्यांत शरण येण्यास लावलें. पण या गोष्टीची त्यांची त्यांनाच इतकी

---

१ 'इंडिअन हिस्टरी कॉंग्रेस' (भारतीय-इतिहास-परिषद्) हिचें १९५० चें अधिवेशन नुकतेंच डिसेंबरच्या शेवटच्या आठवड्यांत नागपूर येथें पार पडलेलें वाचकांस विदित आहेच. नागपूरला होणाऱ्या भारतीय इतिहास-परिषदेच्या निमित्तानें प्रा. त्र्यं. शं. शेजवलकर यांनीं प्रस्तुत लेखांत मध्यप्रांतांतील मराठ्यांच्या इतिहासविषयक संशोधनकार्याचा संक्षिप्त आढावा घेतला आहे. प्रा. शेजवलकर यांच्या अधिकारी लेखणींतून उतरलेलीं प्रस्तुत लेखांतील मतें जिज्ञासु वाचकांस विचार करावयाला लावतील अशीं आहेत. त्याबाबत तज्ज्ञ वाचकांकडून अभ्यासपूर्वक मतप्रकटन झाल्यास, तें 'नवभारतां'तून यथावकाश देण्यास व अशा रीतीनें या विषयाच्या आस्थापूर्वक अभ्यासास मदत करण्यास आम्हांला आनंद होईल.— मध्यप्रदेशाप्रमाणेंच मुंबई व इतर प्रदेश यांतून झालेल्या मराठा इतिहासविषयक संशोधनाचा संक्षिप्त आढावा घेण्याचें प्रा. शेजवलकर यांनीं आमच्या विनंतीनुसार मान्य केलें असून, ते त्यांचे लेख वाचकांस निःसंशय उद्बोधक वाटतील असा विश्वास वाटतो. —का. संपादक



अनुक्रमणिका







लाज वाटत आहे कीं, ते आज कोरियांत लढतांना त्या अस्त्राचा उपयोग करण्यास धजत नाहींत. स्वतःलाच लाज वाटण्यासारखी गोष्ट माणसास करणें भाग पडणें, हा माणुसकीचा खून आहे व तसा प्रसंग मानवावर कधींच येऊं नये म्हणून महात्मा गांधींनीं अहिंसेचें व सविनय सत्याग्रहाचें आचरण राजकारणांत आणण्याचा निर्धार केला. पण या आचरणाच्या वाटेंत खांचखळगे कोणते आहेत ते इतिहासानेंच ओळखतां येणें शक्य असल्यामुळें व त्या ज्ञानाकडे अक्षम्य दुर्लक्ष झाल्यामुळें, हिंदुस्थानांत पाकिस्तान निर्माण होऊन रक्ताचा सडा पडला व त्यांतच एवढ्या उच्च ध्येयाचें आचरण करणारे महात्माजीहि बळी पडले !

इतिहास ही गोष्ट पूर्वजांच्या नांवांवर आजच्या नादानांनीं आपला मोठेपणा मिरविण्यासाठीं नाहीं, किंवा ते पूर्वजच नादान होते असें ठरलें, तरी त्यापासून निरुत्साही व कर्मसंन्यासी होण्यासाठीं नाहीं. तर, त्याचा उपयोग, आज इतिहासपरंपरेनें चालत आलेल्या वा बदललेल्या प्राप्त परिस्थितींत आपण कसें आचरण करावें, यासाठीं आहे. अर्थात् साहित्यसंगीताप्रमाणें केवळ करमणुकीसाठीं किंवा काल्पनिक रचिक गोष्टींपासून खोटा बोध घेण्यासाठीं हा विषय नाहीं, हें उघड होय.

## हिंदुलोकांची इतिहासविमुखता

ज्याप्रमाणें माणसाचा कांहीं थोडीं वर्षें हात फिरला नाहीं तर शेतांत आपोआपच जंगल निर्माण होतें, त्याप्रमाणें इतिहासाचें--म्हणनेच माणुसकीचें--अध्ययन मध्यंतरीं कोणत्याहि कारणांनीं बंद पडलें तर मानवजातींत अनवस्थाप्रसंग निर्माण होतो. हिंदू लोकांची कीर्ति जगांत इतिहासाचे विशेष भोक्ते अशी खासच नाहीं. त्यांहून मुसलमान व त्यांच्याहूनहि पाश्चात्य व त्यांतहि इंग्रज हे इतिहासाचे विशेष भक्त समजले जातात. आम्हीं आपला इतिहास, इतिहास म्हणून क्वचितच लिहून ठेवला असेल. इतिहास--पुराणांना आमच्या संस्कृतींत आरंभीं स्वतंत्र स्थान दिलेलें होतें, असें त्याबद्दलच्या उल्लेखांवरून वाटतें. पण ही परंपरा वाढून उन्नतदशा पावली नाहीं, इतकेंच नव्हे तर ती मूळ परंपराहि पुढच्या राजांनीं साक्षेपानें टिकवून धरली नाहीं. याचा परिणाम असा झाला आहे कीं, सबंध हिंदु लोकांचा इतिहास त्रोटक, क्वचित् कोठें दैववशात् उरलेल्या अत्यल्प साधनांवरून तर्कावा लागतो. विपुल इतिहास लिहिला न जाण्याचें एक भौतिक कारण, लिहिण्याच्या साधनांची दुर्मिळता व काठिणता हें होतें. याउलट, मुसलमानांनीं चिनी लोकांपासून कागद हें साधन उचलून लेखनपरिपाठी वृद्धीस नेली व साहाजिकच ते जास्त इतिहास लिहून ठेवण्यास समर्थ झाले. पण हिंदुस्थानांतील मुसलमानांना येथील हिंदूंचा सहवास याबाबत बाधला. ज्या मानानें इराणी व आरब लोकांनीं आपापले इतिहास लिहिले, त्या मानानें इकडील मुसलमान याबाबत हिंदूच ठरले ! तरीहि गझनीच्या महंमदापासूनचा पुढील हिंदुस्थानचा इतिहास बराचसा त्यांनींच लिहिलेल्या साधनांवरून आज उपलब्ध आहे. तुलनेनें त्यांच्यांत ही परंपरा व त्यामुळें आपोआपच निर्माण होणारा स्वाभिमान जास्त टिकल्यामुळेंच अखेर त्यांतून पाकिस्तान निर्माण झालें, असें एका अर्थानें म्हणतां येईल.

एकंदर हिंदु लोक इतिहासविन्मुख. त्यांत मराठे मुसलमानी संस्कृतीच्या अनुकरणानें कांहीं थोडा इतिहास लिहिण्यास शिकले; पण तोहि त्रोटक, व एखाद्या नवीन राष्ट्राच्या वर्धिष्णु संघटनेस त्याची जितकी आवश्यकता होती त्याच्या अत्यल्प प्रमाणांतहि तो लिहून ठेवलेला नाहीं. राजघराण्यांनीं किंवा थोर कुळांनीं आपले वृत्तांत लिहून ठेवावे, एवढी सामान्य गोष्टहि घडूं शकली नाहीं. ज्यांचीं उत्पन्नें आपण परंपरेनें खातों त्या मूळ इनामी जमिनी ज्यांनीं मिळविल्या त्यांची आजल्यापर्यंतची वंशावळहि लिहून ठेवण्याचें अगत्य क्वचितच कोणीं दाखविलें असेल ! राजघराण्यांच्या वंशावळीहि संशोधकांस परिश्रम करून कशाबशा जुळवाव्या लागतात ही एकंदर महाराष्ट्राची स्थिति, तर त्यांत गोदावरीच्या उत्तरेकडील महाराष्ट्राची स्थिति त्याहूनहि शोचनीय आढळते.

## इतिहाससंशोधनविषयक स्थानिक अनास्था

आपणांस ठाऊक आहे कीं, यादववंशाच्या म्हणजेच ज्ञानेश्वरांच्या काळीं त्या वंशाचें साम्राज्य उत्तरेस नर्मदेपासून तों दक्षिणेस तुंगभद्रेपर्यंत पसरलें








होतें. पण मुसलमानी झाल्यावर यांतील उत्तरेकडील प्रदेश प्रथम मुसलमानांच्या ताब्यांत जाऊन त्यांतून गोंड राजांचीं राज्यें निर्माण झालीं. साहजिकच असा प्रश्न उपस्थित होतो कीं, या कालांत या प्रदेशांतील पुढारलेले व पूर्वीं अधिकार चालविणारे मराठे काय करीत होते ? कीं ते सर्व या प्रदेशांतून पळून दक्षिणेंत जाऊन राहिले ? नंतर चारशें वर्षांनीं पुनः मराठे दक्षिणेकडून पुनः या प्रांतांत येऊन राज्यकर्ते झाले. पण त्यांच्या राज्याचा खरा जम कसा, कोणत्या क्रमानें व कां बसला, याचा वास्तविक इतिहास फारसा उपलब्ध नाहीं. सृष्टीच्या अनुकूलतेमुळें वऱ्हाड, नागपूर, सागर या प्रदेशांतील मराठे दक्षिणेंतील त्यांच्या मागें राहिलेल्या बांधवांपेक्षां जास्त सुस्थितींत राहिले. पण संस्कृति किंवा पुढारीपणा यांत हा कालवर हा प्रदेश मागेंच राहिला. तसा तो कां राहिला, या मागसलेपणाची कारणें अंगभूत आहेत कीं आगंतुक आहेत, हें इतिहासच ठरवूं शकेल.

पाऊणशें वर्षांपूर्वीं पश्चिम महाराष्ट्रांत इतिहासाभ्यासाचें, इंग्रजी शिक्षणाच्या अनुरोधानें, पुनरुज्जीवन झालें. या पुनरुज्जीवनांत नागपूरची एक बखर व नागपूरकर भोसल्यांचे कांहीं कागदहि छापले गेले. पण ही सामग्री जुळवून छापून काढण्यांत पश्चिमेकडील मराठ्यांचाच हात बहुतांशीं होता. स्थानिक लोकांनीं त्यांत थोडाच भाग घेतला. आणि आश्चर्य असें कीं, अजूनहि हीच स्थिति बरीचशी कायम आहे. अशी स्थिति असणें, ही केवळ शोचनीयच नव्हे तर भयंकर स्थिति आहे. ज्यांचा इतिहास बुडाला त्यांचे स्वत्व लोपतें, असा सामान्य सिद्धान्त खरा मानला, तर या गोष्टींत भय कसें उत्पन्न होतें, हें सांगणें नलगे. मध्यप्रदेशांत स्वतंत्र नागपूर विश्वविद्यालय स्थापन झालें, तेव्हां या गोष्टीस जास्त चालना मिळेल अशी अपेक्षा साहजिकच निर्माण झाली. पण ती अत्यल्प प्रमाणांतच पूर्ण झालेली दिसते. अलीकडे सतरा वर्षांपूर्वीं 'मध्यप्रांत संशोधन-मंडळ' म्हणून एक संस्था स्थापन करण्यांत आली. तिचे वार्षिक समारंभ मकरसंक्रमणाप्रमाणें दरवर्षीं एकदां ऐकूं येतात. पण प्रत्यक्ष इतिहासांत भर घालणारे कार्यकर्ते थोडेच निर्माण होतांना दिसतात. जे आहेत ते संस्थेमुळें निर्माण झालेले नसून स्वतंत्रच स्वस्फूर्तीनें पुढें आलेले व कामास लागलेले आहेत. डॉ. यशवंत खुशाल देशपांडे किंवा प्रा. मिराशी हे कांहीं उत्तेजनानें पुढें आलेले संशोधक नव्हत. पण त्यांचेंहि कार्य महत्त्वाचें असलें, तरी नवीन इतिहास निर्माण करण्यास आजवर समर्थ झालेलें नाहीं. तें कणकण साधनें संगृहीत करण्याच्या स्वरूपाचें झालेलें आहे. याचें मुख्य कारण, या क्षेत्रांत तथाकथित आधुनिक विद्वान् फारसे पडत नाहींत, हेंच होय. संशोधकांची संख्या आजच्या शंभरपट वाढेल, तेव्हांच इतिहासास त्याचें खरें स्वरूप आणतां येईल.

### मध्यप्रदेशांतील आधुनिक मराठ्यांचे इतिहास

नागपूरचा जो थोडा इतिहास पुढें आला आहे, त्यांतीलहि बराच भाग विल्सप्रभृति इंग्रजांनीं प्रथम पुढें आणलेला आहे. संशोधनमंडळानें नागपूरकर भोंसल्यांच्या बखरीची नवीन आवृत्ति संपादित करून प्रसिद्ध केली, तींत आवश्यक ते सर्व फेरफार होऊन व टीपा देऊन ती प्रसिद्ध करण्यांत आलेली नाहीं. यादवराव काळ्यांनीं स्वतःच ही नवीन आवृत्ति "यथामति" तयार करून दिली आहे, असें म्हटलें आहे. कांहीं थोड्या मोडी वाचनाच्या चुका व टीपा या आवृत्तींत सुधारलेल्या असल्या तरी त्याहून जास्त स्पष्ट अशुद्ध वाचनें त्यांत अजून शिल्लक आहेत. खरी स्थिति अशी कीं, नामदार काळे हे हाडाचे इतिहासप्रेमी होते तरी खऱ्या अर्थानें संशोधक नव्हते व इतिहासदृष्टि तर त्यांच्यांत सामान्यांइतकीच होती. अर्थात् हा त्यांचा एकट्याचाच दोष आहे असें नाहीं. त्यांनीं इतर तथाकथित संशोधकांच्या मदतीनें जीं दुसरीं पुस्तकें म्हणजे 'ऐतिहासिक पत्रव्यवहार' व 'काव्येतिहास संग्रहांतील पत्रें यादी' प्रसिद्ध केली त्यांतहि अशाच चुका आहेत व अस्सल पत्रें कालानुक्रमें लावलीं असलीं तरी सर्व पत्रांच्या तारखा बिनचूक लावण्यांत त्या सर्वांना यश आलेलें नाहीं. मध्यप्रदेशांतील आधुनिक मराठ्यांचे म्हणण्यासारखे इतिहास मराठींत तीनच लिहिले गेले आहेत. ते म्हणजे 'बुंदेलखंडांतील मराठ्यांचे पराक्रम' रावबहादुर पारसनीस यांनीं १८९५ सालीं प्रसिद्ध केले ते, व काळ्यांचे वऱ्हाड व नागपूर प्रांतांचे इतिहास.







तेव्हां एका दृष्टीनें काळ्यांकडे अनन्यसाधारणत्व या प्रांताचे इतिहासकार म्हणून आपोआपच येतें. काळे हे इतके निगर्वी इसम होते कीं, त्यांच्या इतिहासावर कडक टीका करण्यास सदभिरुचीचा कोणीच टीकाकार धजणार नाहीं. आम्ही या ठिकाणीं जें लिहीत आहों त्या स्वरूपाची, उणीवा दाखविणारी व अनास्थेबद्दल हळहळ वाटणारी सौम्य टीका त्यांनीं स्वतःच आपल्या प्रस्तावनेंत नमूद करून ठेवली आहे. "नागपूर प्रांतांत इतिहासाचे अभ्यासक व जिज्ञासू यांचा दुष्काळ आहे" असें त्यांनींच म्हटलें आहे. पण "सर्व साधनें उपलब्ध झालीं असून वाण काय ती अभ्यासकांचीच आहे" हें त्यांचें मत आम्हांस मान्य नाहीं. सरदेसाई, कुलकर्णी किंवा काळे या तिघांनाहि सहज उपलब्ध होण्यासारखीं व सार्वजनिक संग्रहालयांत सर्वांना खुलीं असणारीं साधनें त्यांनीं पाहिलेलीं दिसत नाहींत, व पाहिलीं असलीं तर त्यांचा उपयोग त्यांना करून घेतां आलेला नाहीं. भवानी काळू, भवानी मुनशी व दिवाकरपंत चोरघोडे यांचें चिटोरेंहि त्यांच्या घराण्यांत सांपडत नाहीं हें दुर्दैव असेल. पण इतर ठिकाणीं त्यांची मूठभर का होत ना, पण पत्रें उपलब्ध आहेत, ही वार्ताहि या संशोधकांना नसावी हें महान् आश्चर्य समजलें पाहिजे. आणि याचें कारण, खरी संशोधकांची भूमिका या विद्वानांना उचलतां आली नाहीं, हेंच होय. यामुळें ते स्वतः तर अज्ञानी राहिलेच पण त्यांनीं उपलब्ध असलेलीं सर्व साधनें पाहून इतिहास लिहिला, असें मानणारे इतर विद्यार्थीहि फसत आले. आम्ही स्वतः त्या फसलेल्यांपैकींच एक आहोंत.

## चुकीचें वाचन

सरदेसाई यांच्या रियासतींत त्यांच्या नेहमींच्या पद्धतीप्रमाणें नागपूरकर भोंसल्यांच्या व बुंदेलखंडांतील मराठ्यांच्या त्रोटक हकीकतीचें संकलन आलेलें आहे. पण त्यांची इतिहासपद्धतिच चुकीची असल्यामुळें ज्या तऱ्हेनें त्या त्या प्रकरणाचें उद्घाटन झालें पाहिजे, त्याप्रमाणें तें झालेलें नाहीं. तसाच प्रकार सरदेसाई यांना आदर्श मानणाऱ्या काळ्यांचा झाला आहे. पेशवे-दप्तरांतील कांहीं कागद प्रसिद्ध झाले पण त्यांचा विनियोग कसा करावा हें अंगीं रुळलें नसल्यामुळें ते प्रसिद्ध होऊन नसल्यासारखेंच झालें आहे. सरदेसायांनीं नागपूरकर भोंसल्यांच्या विशाव्या भागांत पत्रांवर ज्या तारखा दिल्या होत्या त्या तशाच अनुसरल्यामुळें काळे यांचें लेखन गोंधळाचें झालें आहे. तारखा कशा लावाव्या किंवा चुकीच्या तारखा कशा बरोबर कराव्या, हें माहीत नसल्यामुळें अशी गोष्ट घडली. सूक्ष्म नकाशांचा उपयोग कसा करावा, हें माहीत नसल्यामुळें दुसऱ्या तऱ्हेच्या चुका होतात. त्यांचाहि प्रादुर्भाव या लिखाणांत मधूनमधून दिसतो. इंग्रजी नकाशांत मूळ हिंदी नांवांचे अपभ्रष्ट उच्चार दिलेले असतात व त्यांचे पुनः नागरी लिपींत रूपांतर करतांना प्रत्येक लेखकाच्या लकबीप्रमाणें त्यांत पुनः चुका होतात. यावर खरा उपाय म्हणजे स्थानिक लोकांचे उच्चार मिळवून अनुसरणें, हा होय. याचीं दोन उदाहरणें येथें देतों. ओढिसांतील कटक या राजधानीहून नागपुरास येण्यास जो रस्ता आहे त्यांत महानदीच्या दक्षिणतीरीं डोंगरांतून अरुंद वाट असलेली एक दरवाजाप्रमाणें खिंड आहे. तिचें नांव काळे यांनीं बारमल असें दिलें आहे. येथें इंग्रजी 'ए'चा 'आ' असा उच्चार केल्यामुळें 'बा' लिहिण्यांत आला. इंग्रजी 'आर्' हें अक्षर 'र' असें तसेंच उतरण्यांत आलें. खरें म्हणजे तो 'ड' आहे व मूळ बड (म्हणजे वड) आहे; आणि मल हें इंग्रजींत Mul असें लिहिलेलें 'u' चा उच्चार 'अ' असा वाचल्यामुळें 'मल' झाला आहे. गांवाचें खरें नांव बडमूल हें आहे व तसा उच्चार काळ्यांनीं पाहिलेल्या लेकीच्या प्रवासवृत्तांत दिलेलाहि आहे. दुसरें उदाहरण, ओढिसांतील एका संस्थानाचें नांव. काळ्यांच्या इतिहासांतील नकाशांत त्याचें नांव कौंझर असें दिलेलें आहे. पण त्याचा मोडी कागदपत्रांत आलेला उल्लेख केंवझड असा आहे व तोच जास्त खरा उच्चार आहे. असेच अपभ्रष्ट उच्चार चुकीच्या इंग्रजीवरून देशी भाषांत रूढ होत आलेले आहेत. नागपूरकरांच्या बखरींत, पान ५३ वर, 'मलाड हे' सरकार हंडिया असें दिलेलें आहे तें 'मकडई' हें समजण्यास मध्यप्रांतांतील माणसास अडचण नसावी. तसेंच शाहूनें रघूजीला सुभे दिले, त्यांची यादी पृ. ५०-५१ वर देतांना बेहारचें बेदर हें पहिल्या आवृत्तींत केलेलें चुकीचें वाचन तसेंच शिल्लक असून










सुभा हाजीपूर—पटणे यावर ' ओरिसांतील एक लहान संस्थान ' अशी दिलेली चुकीची टीप तशीच ठेवलेली आहे. वस्तुतः हाजीपूर हें नांव जोडल्यावर पटणे हें कोणतें याबद्दल शंका निर्माण होण्याचें कारण नाहीं. खरें म्हणजे मूळ बखरकारालाच भूगोलाचा गंध नव्हता. त्यानें चुकीनें कांहीं तरी लिहून ठेविलें व त्याचें चुकीचें वाचन छापलें गेलें. तें तसेंच आजवर सुधारलेल्या द्वितीय आवृत्तींतहि नवीन वाचकांना चकविण्यास शिल्लक राहावें ही केवढी आश्चर्याची गोष्ट ! आमचा अनुभव याबाबत असा आहे कीं, ज्या पुस्तकावर मोठ्यांचीं नांवें घातलीं जातात त्यांच्याकडून तीं तीं कामें क्वचितच कसोशीनें किंवा स्वतः अंग मोडून केलीं जातात. कोणी तरी कारकूनवजा सहायक हें काम करीत असतो व यामुळेंच त्या मोठ्यांच्या नांवाला कमीपणा येतो.

## दुसऱ्याची विचारसरणी समजून घेणें अवश्य

वर सांगितलेल्या तांत्रिक चुका सोडल्या तरी इतिहासविवेचनाच्या मोठ्या चुकाहि या इतिहासांत बऱ्याच आहेत. याचें एक कारण म्हणजे इतिहासांत कांहीं माणसांचीं नांवें त्यांच्या खऱ्या कर्तबगारीपेक्षां जास्त प्रसिद्ध होतात व त्याला आगंतुक कारणें झालेलीं असतात. वस्तुतः कोणत्याहि स्वतंत्र इतिहासकारानें आपला इतिहास लिहितांना दुसऱ्याचीं मतें स्वतः तपासल्याशिवाय तशींच उतरूं नयेत. उदाहरणार्थ, नाना फडणीस हे अर्धे शहाणे म्हणून पेशवाई आख्यायिकेंत नमूद आहेत. पण अलीकडील इतिहासकारांनीं त्याला पुरेंच काय, पण कदाचित् दीड शहाणें करून मुळाच्या तिप्पट श्रेय त्यांच्या पदरांत टाकलें आहे ! याउलट, पुरे शहाणे म्हणून ठाऊक असलेले सखाराम बापू किंवा दिवाकरपंत यांच्या शहाणपणाची मांडणी कोणाहि इतिहासकारानें करून दाखविलेली नाहीं. उलट, ते स्वार्थी, फसवे व देशद्रोही होते अशीच त्यांच्या चरित्राची सरणी लावून दाखविलेली दिसते व ती प्रथमदर्शनीं खरीही वाटते. पण मूळ साधनें बारकाव्यानें अभ्यासिलीं, तर या मुत्सद्यांवरील प्रवाद वेगळ्या तऱ्हेनें चर्चितां येतील व त्यांवर आलेले दोषारोप बरेचसे नरम पडतील. प्रत्येक मुत्सद्याची स्वतःची अशी एक विचारसरणी व आचरणप्रणाली अंगीं रुळलेली असते. त्याप्रमाणें तो तो पुरुष वागतो. आज हिंदुस्थानांत पटेल आणि नेहरु किंवा विलायतेंत चर्चिल आणि ॲटली कसे वागतात, हें त्या त्या पुरुषांच्या अंगभूत संवयीवरच अवलंबून राहतें, हें आपण पाहतों. तीच गोष्ट वर सांगितलेल्या जुन्या मुत्सद्यांची होती. विशिष्ट परिस्थितींत विशिष्ट कामाला यांतील कोणता-तरी एकच पुरुष सर्वांत योग्य ठरतो. पण याचा अर्थ इतर ते निकामी, असें समजणें अयोग्य ठरेल. नाना फडणिसाची बाजू मांडणारे विशिष्ट अभिमानानें तोच शहाणा असें समजतात. पण दुसऱ्यांची विचारसरणी जाणून घेण्याचा प्रयत्नहि क्वचितच करतात. येणेंकरून इतिहासास वैगुण्य प्राप्त होतें. तसेंच, सर्व मूळ आधार पाहून इतिहास क्वचितच लिहिले जातात. असाच बराचसा प्रकार काव्यांच्या इतिहासांत झालेला आहे. ही गोष्ट विस्तृत लेखनानें सिद्धहि करून दाखवितां येईल; पण त्याचें हें स्थळ नव्हे.

## नवीं उपलब्ध साधनें

अलीकडे आमच्या वाचनांत सहजगत्या एक प्रकरण पहाण्यास लागलों असतां कांहीं न उपयोगांत आणलेले कागद आले. त्यावरून अठराव्या शतकांतील शेवटच्या पंचवीस वर्षांचा इतिहास नागपूरबाबत बराचसा बदलावा लागेल, असें स्पष्ट दिसतें. विल्सनें पंचवीस वर्षांपूर्वीं आपला नागपूर राज्याचा इतिहास इंग्रजींत लिहिला तेव्हां त्यानें आपल्या प्रस्तावनेंत या भागाला " Forty Years Forgotten " (विसरलेलीं चाळीस वर्षें) हेंच नांव योग्य ठरेल, असें म्हटलें होतें. नागपूरकर भोसल्यांबाबत माहिती मिळत नाहीं, अशी तक्रार आजवरच्या सर्वच मराठी इतिहासकारांनीं केलेली आहे. विल्सनें मराठी साधनें त्याला अवगत नसल्यामुळें आपण आपला इतिहास इंग्रजांच्या दृष्टीनें एकांगीच लिहीत आहों, असें स्पष्ट म्हटलें होतें. पण आतां ती अडचण नाहीं. जानोजी, साबाजी, मुधोजी, रघूजी, खंडोजी व व्यंकोजी; तसेंच दर्याबाई व चिमाबाईप्रभृति भोसले घराण्यांतील स्त्रिया; भवानी काळू, दिवाकर पुरुषोत्तम, भवानी नागनाथ, कृष्णराव माधव, श्रीधर बापू, सदाशिवराम गुणे प्रभृति कारभारी, वकील व मुत्सद्दी, व भोंसले घराण्याचे










## मध्यप्रदेशांतील मराठ्यांच्या इतिहासाची अनास्था

निजाम, इंग्रज, पेशवे, होळकर, शिंदे, बुंदेले प्रभृतींशीं असलेले संबंध याबद्दलची बरीच स्वतंत्र व स्थानिक बाजू यथातथ्य देणारी माहिती उजेडांत येणार आहे. ज्यांच्या पत्रांतून ही माहिती येणार आहे त्यांचीं कांहीं पत्रें, खलितें व बातमीपत्रें पूर्वींच मराठी साधनांत प्रसिद्ध झालेलीं आहेत. पण त्यांचा मागोवा घेत, तीं कोणत्या गठ्ठयांतून घेतलीं आहेत याचा सहज तर्क होण्यासारखा असूनहि व साधनें सार्वजनिक असतांनाहि, परामर्श घेतला गेला नाहीं. सरदेसाई, कृ. पां. कुलकर्णी व काळे या सर्वांना हीं साधनें खुलीं होतीं. पण त्यांना तीं पाहाण्याची आवश्यकता भासली नाहीं. याउलट, इंग्रजी साधनांचा बडिवार माजवून तीं जास्त अवलंबिण्यांत आलीं. या नव्या साधनांचा पूर्ण परामर्श घ्यावयाचा तर मध्यप्रदेशांतील स्थानिक माहितीशीं व भूगोलाशीं तिची सांगड घालून दिली पाहिजे. पण हें सर्वच काम खर्चाचें, श्रमाचें व काळाचें आहे.

### काळाच्या सातत्याची ओळख

वर सांगितलेलीं साधनें अभ्यासिलीं तर त्यावरून वऱ्हाड, नागपूर, गोंडवन व बुंदेलखंडचा दक्षिण प्रदेश यांतील समाजाच्या घडणीवर व इतिहासावर नवा प्रकाश पडेल. पुण्याकडील मराठे व नागपुरांतील मराठे यांत फरक कां पडले; त्यांचीं सामाजिक कारणें कोणतीं; परस्परांत भेदभाव, हेवादावा, अविश्वास, असहकार हे कां निर्माण झाले; या दोन समाजांचें शिक्षणच कसें वेगळें घडलें; एकसंधी महाराष्ट्र निर्माण न होतां त्यांत बेकी कशी रुजली, हें सर्व या सामाजिक व राजकीय कागदांवरून कळतें. त्यावरून आजहि हा दुजाभाव कां टिकून आहे, याचा अंदाज येतो. आजच्या मध्यप्रदेशांतील मराठ्यांच्या राजकारणाचा पाया अठराव्या शतकांतच घातला गेला होता, हें समजून काळाच्या सातत्याची ओळख पटते व आजहि संयुक्तमहाराष्ट्र निर्माण होण्यास कोणत्या सामाजिक, आर्थिक, मानसिक, न्यूनगंडांचा अडथळा होतो, हें ध्यानांत येण्यास मदत होते.

---

## श्रीअरविन्दांचें निर्वाण

मानवतेच्या मंदिरांतला
 हवेंत विरला धूप आजला
ज्ञानप्रभावें सतत तेवता
 दीप आजला मालवला ! १

आज खुंटली ज्ञानपिपासा
 जाणुन घेण्या विश्वकथा ही
शाश्वत मूल्यें, शाश्वत सत्यें
 पाचोळ्यासम आतां ठरलीं ! २

विज्ञानाच्या क्रौर्यावरतीं
 मात कराया ज्ञान तळपलें
ज्ञानचक्षु हा आतां मिटतां
 विज्ञानाचें सोंग पिसाळे ! ३

दो युद्धांच्या विध्वंसांतुन
 प्रेतकळा ये जगतावरती
अस्त्रांना अन् माणुसकीला
 भस्मराशि ते दांत विचकती ! ४

वेदांचे जयघोष थांबले
 ‘ शांतिस्तुष्टिः ’ सुकून गेल्या
‘ स्मृति-पाठां ’च्या अभिनव गाथा
 इंद्रायणिच्या डोहिं बुडाल्या ! ५

मानवतेच्या वैजयंतितिल
 अखेरचें हें पुष्प गळालें
थयथयणाऱ्या अण्वस्त्राला
 रान मोकळें आता झालें ! ६

—मधुकर जावडेकर.








# प्रेमपिया रंगीले उस्ताद फैयाजखां

> " You may have mastered the technique of your musical instrument, but your power to grip your audience depends not on your amazing technical display—that only astonishes—but on your power of being interesting "—

उत्तरेंत ग्वालेर, दिल्ली, आग्रा, लखनौ हीं गवयांचीं प्रसिद्ध अशीं शहरें पन्नास वर्षांपूर्वीं होतीं. आपल्या महाराष्ट्रांत तेव्हां सातारा, पुणें येथील दरबारांत उत्तरेकडूनच ध्रुपदियांची आयात करीत असत. ग्वालेरला सोळाव्या शतकांत मानराजाच्या वेळीं व नंतर मोगल बादशाहांच्या पदरीं तानसेन, ब्रिजचंद दागुरसारखे कलावंत ( ध्रुपदगायक ) होऊन गेले. आग्रा-दिल्लीहून गायक राजस्थान, मारवाड, बुंदेलखंड, माळव्यांत तेथील राजदरबारीं जाऊन राहिले. बहुतेक पोटाच्या सोयीकरितांच ! ख्यालगायनाचा मूळ रचनाकार सरदार अमीर खुश्रु ध्रुपदगायन पुढें येण्याच्या आधींच चौदाव्या शतकांत अल्लाउद्दीन खिलजीच्या कारकीर्दींत होऊन गेला. तें ख्यालगायन प्रत्येक पिढीनें जतन केलें व दिल्लीच्या महंमदशहा बादशहाच्या दरबारांत सदारंग, अदारंग या मान्यवर कलावंतांच्या प्रयत्नानें सरकारी रीत्या मान्य झालें, आणि हळूहळू पण खात्रीनें ख्यालगायनानें ध्रुपदगायन आज नाममात्र शिल्लक ठेविलें आहे. आज तर ध्रुपदगायन ही एक नवलाची पण ' चालवून ' घेण्याजोगी गोष्ट म्हणून मानली जाते. गेल्या सव्वाशें वर्षांत ख्यालगायनाचीं खूप घराणीं झालीं, पण ह्यांतील महत्त्वाच्या दोनच पठडी महशूर आहेत. एक ग्वालेर पठडी व दुसरी जयपूर पठडी. वास्तविक हे ख्यालगायक सुरवातीला ध्रुपद-गायनाची तालीम घेत असत; कारण त्या काळीं व अजूनहि गायकवर्गांत ध्रुपदगायन उच्च दर्जाचें मानलें जाई. जयपूरचे प्रख्यात ध्रुपदगायक वजीरखां याच अभिमानानें, 'ख्यालगायकांनीं तान मारून आमचे राग बिघडवून टाकले' असें म्हणत. ( व तें खरेंहि आहे. याबद्दलची अद्ययावत् उदाहरणें मीं पुराव्यासह माझ्या ' आवाजाची दुनिया ' या पुस्तकांत दिलीं आहेत. असो. ) या ग्वालेर घराण्याचे ख्यालगायक ( बडे महंमदखां व त्यांचीं मुबारक, अल्लीखांदि मुलें, नथ्थन पीरबक्ष व त्यांचे नातू हद्दू-हस्सूखां ) हे मूळचे लखनौचे, पण ग्वालेर दरबारीं गायक म्हणून राहिले. त्यांची शिष्यपरंपरा चोहोंकडे फांकली. ग्वालेरहूनच गायक आग्रा-दिल्लीकडे पसरले. वास्तविक ग्वालेर पठडीला लखनौ–पठडीच म्हटलें पाहिजे, पण व्यवहारांत ग्वालेर–पठडीच म्हणतात.

## तंत्र हें रसनिर्मितीकरितां

आग्रा घराण्यांतील मियाँ रंगीले हे गायक, त्यांनीं हजारों रंगतदार चिजा बांधल्यामुळें शंभर वर्षांपूर्वीं महशूर झाले. त्यांचेच पणतू फैयाजखां ! फैयाज गर्भावस्थेंत सहा महिन्यांचे असतांनाच त्यांचे वडील सफ्दर हुसेनखां वारले. तेव्हां त्यांच्या माता-महांनीं—गुलाम अब्बासखांनींच त्यांना लहानाचें मोठें करून वयाच्या पांचव्या वर्षांपासून ते पंचवीस








# प्रेमपिया रंगीले उस्ताद फैयाजखां

वर्षांचे होईपर्यंत गायनाची ( ध्रुपद-धमाराची ) तालीम दिली. आजोबा गुलाम अब्बासखांचे वडील घग्गे खुदाबक्ष हे नामवंत कलावंत होऊन गेले. खुदाबक्षांचा आवाज फारच ढाला असून त्या धोरणानेंच त्यांनीं खर्जांतील ( मलुहा-केदार, मेघमल्हार, मियाँमल्हार, दरबारी कानडा, हेम, हेमकल्याण ) रागांची खूप मेहनत करून गळा खूप वजनदार व तयार केला होता. असाच पणजोबांचा आवाज फैयाजखांना निसर्गानें दिल्यामुळें एकीकडून आवाज व उच्च तालीम व दुसरीकडून रंग फैयाजखांना मिळाल्यामुळें खर्ज-मंद्रांतील रागांचें त्यांचें गायन प्रकर्षानें रंगे. त्यांचे चुलते फिदाहुसेनखां यांनींहि त्यांना तालीम दिली. दुसरे चुलते कल्लनखां यांनीं त्यांना धमार शिकविला. गुलाम अब्बासखां आग्र्याला राहत असल्यामुळें फैयाजला आजोबांच्या पुतण्याचा-विलायतहुसेनखांचे वडील व कै. भास्करबुवा बखले यांचे गुरु नथ्थनखां यांचा सहवास घडला होता. वडिलांचीं व मातुःश्रींकडील घराणीं ध्रुपद-धमारियांचीं असल्यामुळें प्रथम फैयाजला तें शिक्षण मिळालें. नंतर ख्यालाची तालीम मिळाली. गुलाम अब्बासखांचा आवाज अति सुरेल होता. व त्यांची असावरी-जौनपुरी-तोडीमधील आलापचारी वाखाणण्यासारखी होत असे. यांत ते तानबाजी करीत नसत असें गु. वझेबुवा मला नेहमीं सांगावयाचे. फैयाजचे ' नोम्‌तोम् ' मधील व ख्याल भरतांना केलेले आलाप वैशिष्ट्यपूर्ण होत असत याचें मूळ या आजोबांच्या सुरेल आलापांच्या तालमींत सांपडतें. घराण्याच्या गायकीच्या तालमीमध्यें गात असतांना गायनाचें प्रत्येक अंग पद्धतशीर गाइलेंच पाहिजे असा कटाक्ष असे. यालाच त्या घराण्याची " रीत " म्हणतात. म्हणूनच ' नोम्‌तोम् ' ( नोम थोम नव्हे ) पाऊण तास एक तास पद्धतशीर केल्याशिवाय फैयाजखां धमार कधींच गात नसत. नोम्‌तोम् झाल्यावर धमाराऐवजीं कोणी फरमाइश केल्याखेरीज ते ख्याल गात नसत. कित्येकदां ख्यालच गावयाचा असल्यास ते विलंबित ख्यालच एकदम सुरू करीत असत पण रीत कधींहि सोडीत नसत. गौड मल्हारांतील मोठा ख्याल " काहे हो " किंवा मलुहाकेदारांतील " अचरा मोरा ", दरबारींतील " मालनिया बंधनवार ", देशींतील " मोरा मन हर लीनो " हे त्यांनीं नोम्‌तोम्‌शिवाय एकदम मैफलींत सुरू केलेले मीं अनेकदां ऐकले आहेत. ख्याल गातांना अस्ताई-अंत्रा ख्यालगायनपद्धतीनें भरल्याशिवाय आलापचारी बढत ते कधींच करीत नसत. रेडियोवरहि दिलेल्या थोड्या अवकाशांत गायकीचीं सर्व अंगें त्या त्या प्रमाणांत क्रमशः विशद करीत करीतच ते रंग मारीत. कोठल्याहि एका अंगाला त्यांनीं साफ वगळल्याचें मला तरी आठवत नाहीं. त्याशिवाय ख्याल भरतांना शब्द व स्वर यांचें मधुर मिश्रण करूनच तें सर्वसामान्य श्रोत्यांना त्यांत रंगवीत व ख्यालगायन चित्तवेधक करीत. हें त्यांचें इतर समकालीन गायकांपेक्षां एक निराळें वैशिष्ट्य होतें. धमारामधील बोल उपज तयारीच्या अंगानें करीत असतांना सुद्धां शुद्ध व सार्थ वाणीनें त्यांत रंगत निर्माण करण्याचें त्यांचें विशिष्ट तंत्र असल्यामुळें त्यांचे धमारहि सर्वसामान्य श्रोत्यांना खुलवीत असत. पुणें येथील १९४९ सालच्या संगीत-परिषदेमध्यें दुपारी बर्वा रागांमधील 'नोम्‌तोम्' झाल्यावर त्यांतील धमार गात असतांना त्यांनीं अगदीं शेवटपासून पहिल्या रांगेंतील श्रोत्यांपर्यंत सर्वांकडून वाहवावर वाहवा घेतल्याचें उदाहरण स्मरणांत ताजें आहे. सर्वसाधारणपणें ध्रुपद-धमार म्हणजे श्रोत्यांच्या कानांवरून जाणारें गायन ! पण फैयाजखां त्यांत रंगतीचें आपलें सगळें कसब ओतून त्यांतून रसाचे फवारे उडवून श्रोत्यांना गारीगार करीत असत. त्यांची वृत्तीच रसीली ! त्यामुळें त्यांचें सर्व तंत्र त्या रसनिर्मितीकरितां, रंगनिर्मितीकरितां त्यांनीं राबविलें. तंत्राचा, शास्त्राचा निरर्थक नुसता बडिवार त्यांनीं कधींच माजविला नाहीं. तंत्राचा फाजिल बडिवार माजविणारे व त्यांतच गायनाचें सर्व कांहीं रहस्य भरलें आहे असें समजणारे गायक मैफल कधींच रंगवूं शकले नाहींत, श्रोत्यांना केव्हांहि आपलेसे करूं शकले नाहींत, असा अनुभव आहे, व अशा वृत्तीचे अनेक ' पडेल ' गायक आज हयात आहेत. तंत्र हें साध्य नसून साधन आहे हें अजूनहि त्यांना उमजत नाहीं. म. अब्दुल करीमखां, रहिमतखां, कै. भास्करबुवा बखले, कै. रामकृष्णबुवा वझे, मरहूम मंजीखां,








म. फैयाजखां यांच्या अनेक रंगलेल्या मैफली ऐकूनहि यांच्या डोक्यांत अजूनहि यांच्या मैफली हमखास कां रंगतात यावर प्रकाश पडून खुलासा झाला नाहीं. कलेच्या सर्व क्षेत्रांत—मग ती चित्रकला असो, चित्रपटकला असो, संगीतकला असो, नाट्यकला असो, नृत्यकला असो—तंत्राचा फाजिल बडिवार माजविणारे असे भाबडे जीव पुष्कळ आढळतात. सुदैवानें वरील कलावंतांनीं 'तंत्र' हा शब्द ऐकलाहि नसल्यानें त्याचा अमंगल स्पर्श त्यांच्या मूळच्या व तालमीनें परिपक्व झालेल्या रसील्या वृत्तीला झाला नाहीं हें केवढें सुदैव !

## रसील्या वृत्तीबरोबर 'रियाजी' वृत्ति

फैयाजखांसारखे रसीली वृत्तीचे गायक मैफलींत श्रोत्यांना केव्हांहि विसरत नाहींत. त्यांना खूष करण्याकरितां आपण तंबोरा हातांत घेऊन बसलों आहोंत, याची त्यांना पक्की जाणीव असते, आठवणहि असते. म्हणूनच श्रोत्यांवर त्यांची शोधक नजर चौफेर फिरते असते. मैफल गायनांतील एकाद्या अंगानें सुस्त होते असें दिसलें तर त्वरित पुढील अंग ते सुरू करतात. एखादी तयारीची जागा अथवा उपज घेऊन ती सुस्ती उडवून लावतात. बोल नटवून खुलवून म्हणतात. त्यांना भावनेचा ओलावा देतात. असे मुसलमान गायक विद्यार्थिदशेमध्यें आपल्या सर्वस्वाचें अर्पण करून एकाचित्तानें 'रियाज' करतात. आपले नातेवाईक, बायकामुलें, आईबाप यांची त्यांना आठवणहि त्या वेळीं होत नाहीं. आठ आठ, दहादहा तास मेहनत करणें त्यांच्या हिशेबीं नसते. 'खूब खाना और दिमरा। रियाज़ करना' हाच त्यांचा मंत्र ! अगदीं 'आत्मा मन्तव्यो श्रोतव्यो निदिध्यासितव्यः' या सूत्रानुरूप त्यांचा दिनक्रम असतो. मुसलमान गायकांमध्यें रसील्या वृत्तीबरोबर ही रियाजी वृत्ति हिंदू गायकांच्या मानानें फार मोठ्या प्रमाणात असते. विद्येकरितां, कलेकरितां, धर्माकरितां सर्वस्वाची कुर्बानी मुसलमान गायकच करतात. ते आत्मसुख तुच्छ मानतात. याचीं दोन उदाहरणें येथें मुद्दाम देतों. प्रख्यात सारंगीवाले म. कादरबक्ष आपल्या वडिलांची गोष्ट सांगत. आपल्या शिष्यांना तालीम द्यावयाच्या वेळीं ते सगळें जग विसरत असत. त्या वेळीं त्यांना कोणी येऊन उपसर्ग दिलेला खपत नसे. कादरबक्षांची मातुःश्री एके दिवशीं सकाळींच वारली तेव्हां वडिलांना कळवावयाला ते शिष्याच्या घरीं तालीम चालू असतांना गेले आणि रडत रडत त्यांनीं ती बातमी त्यांना सांगितली, तेव्हां 'अबे बेवकूब, रोता क्या है ? जाओ, भाई बिरादरोंको बुलाओ, सब तय्यारी करो, फिर मुझे बुलाने आओ' असें त्याला खडसावलें व कांहीं विशेष झालेंच नाहीं असें समजून त्यांनीं तालीम पुढें चालू ठेवली ! बडे गुलामअलींचे चुलते व वडील तारुण्यांत असेच रियाजी होते. योग्य कालीं त्यांच्या जमातीनें त्यांचीं लग्नें ठरावेलीं व रिवाजाप्रमाणें लग्नास लागणारें सर्व साहित्य (मुख्यतः तूप, रवा, बदाम, पिस्ते, खारीक, बेदाणा वगैरे) त्यांच्या घरीं आणून ठेवलें. रात्रीं हे दोघे भाऊ सामानाकडे पहात बसले असतांना एक दुसऱ्याला म्हणतो, "सामान तो खूब इकट्ठा हुआ है."

"हां— मेहनत करनेके लिये यह छः महिनेतक जाएगा."

"फिर क्या इरादा है ?"

"अरे भाई, शादी तो कभीभी हो सकती है— लेकिन ये सामान देखकर और छः महिने मेहनत करनेको जी चाहता है—"

आणि दुसरे दिवशीं लग्न लांबणीवर टाकल्याचा निश्चय दोघा भावांनीं जमातीला जाहीर केला व दुप्पट जोरानें त्यांनीं रियाज सुरू केला. आमच्या हिंदु गायकानें अशा प्रसंगीं अगोदर लग्न उरकून घेतलें असतें, आणि मग मेहनतीकडे पाहिलें असतें ! भास्करबुवा बखल्यांनीं आपल्या शिष्यांना मुसलमान गवई कशी मेहनत करतात हें प्रत्यक्ष दाखविण्याकरितां एकदां त्यांना संध्याकाळीं नळबाजाराजवळच्या मुसलमानांच्या एका चाळींत नेलें. तळमजल्यावर एका खोलींतून भूपालीच्या स्वरांचा आरोह-अवरोह ऐकूं येत होता. बुवा शिष्यांसह तेथेंच थबकले व शिष्यांना 'ऐका' म्हणून त्यांनीं खुणेनें इशारा दिला. प्रथम प्रथम स्वर बरोबर लागत नव्हते. नंतर तासभरानें तेच स्वर लोचदार, सुरेल ऐकूं येऊं लागल्यावर बुवांनीं पुनः एकदा शिष्यांकडे सहेतुक पाहिलें व शिष्यांसह ते त्या








गवयाच्या खोलींत शिरले. गवई म्हातारे कालेखां होते. त्यांचें वय पाहून शिष्यांना तर अचंबाच वाटला ! एवढ्या वयांत कीर्ति मिळविल्यावरहि अजून त्यांचा रियाज चालूंच होता व मरेपर्यंत राहणारहि होता. बुवांनीं खांसाहेबांना सांगितलें : " माझ्या शिष्यांना मेहनतीनें गळा कसा पाक सुरेल होतो हें दाखवायला घेऊन आलों होतों."— अशीच मेहनत भास्करबुवांनीं, सवाई गंधर्वांनीं गुरुगृहीं केली. बाळकृष्णबुवांचा तर दर गुरुवारीं उपोषण करून सर्व चिजांचा पाठ म्हणण्याचा क्रम आमरण चालूं होता. एका गुरुवारीं मीं त्यांची ही उजळणी ऐकली होती. फैयाजखांनीं आजोबांपाशीं वीस वर्षें मेहनत केली होती तरी त्यांचा रोजचा रियाज चालूंच असे. एकदां माझ्या स्नेह्याकडे पहांटे तीन वाजेपर्यंत गायल्यावर खांसाहेब पलंगावर पहुडले—आम्हीहि हॉलमध्यें बैठकीवर झोंपलों; तासाभरानें जागे होऊन त्यांनीं ललत छेडायला सुरुवात केली व आम्ही सकाळीं आठाला उठेपर्यंत त्यांची अनेक उत्तर-रागांची छेड स्वतःशीं चालूंच होती. आयुष्यांत ध्येय एकच, कार्य एकच, हाच त्यांचा बाणा ! संगीत-तपश्चर्येची मुदत खांसाहेबांनीं ठरविली नाहीं——मृत्यूनें ठरविली !

फैयाजखांसारखे मुसलमान गवयी व्यसनी असत —पण तें व्यसन रियाजाकरितां एकाग्रता करावयाला मदत म्हणून ते लावून घेत ! मग तें कायमचें राही. त्याचीहि मुदत मृत्यूच ठरवितो. फैयाजखांना जलोदर झाल्यावर दारू कमी करण्यास डॉक्टरांनीं सांगावें, त्यांनीहि 'हो' म्हणावें—पण त्यांचें व्यसन त्यांच्याबरोबरच मृत्यूनें नेलें हें अखेरचें सत्य ! खांसाहेब मैफलीहून आल्यावर त्यांचे शिष्य बशीर-महंमद त्यांचा कोट निघायची वाट पहात टेहळणी करीत. कोट काढून खुंटीवर ठेवून ते झोंपायला गेले कीं बिदागीच्या पैशांतील हाताला लागेल ती रक्कम काढून घरांत शिल्लक ठेवायची चलाखी बशीर महंमद करीत असत. कारण दुसऱ्या दिवशीं राहिलेले पैसे 'जॉनी वॉकर' नाहीं तर 'व्हाइट हॉर्स' किंवा आलेगेले गरजू घेऊन जात असत. जिवंत असे-पर्यंत या शिष्यानें अशा क्लृप्तीनें खांसाहेबांचा बराच पैसा शिलकींत टाकला. पण हा इमानी शिष्यच खांसाहेबांच्या अगोदर गुजरला. आमच्यांत व्यसन करण्याची हिंमत नाहीं; अन् केलें तर तें आपल्या ध्येयप्राप्तीच्या कष्टाकरितां आहे, हें आम्ही विसरतों, आणि मग ध्येयप्राप्ति नाहीं आणि व्यसनांतून सुटकाहि नाहीं अशी आमची दुहेरी वाईट स्थिति होते. व्यसनाखेरीज रियाज करतांच येत नाहीं असें माझें म्हणणें नाहीं. कै. बाळकृष्णबुवा व वझेबुवा निर्व्यसनी होते असें म्हणतात. तरीहि बाळकृष्ण-बुवांना चिलीम लागेच ! आणि वझेबुवांना तंबाखूचा बार भरावाच लागे. आणि त्यांचें खाणें ? ते जवळजवळ व्यसनासारखेंच ! 'खाना और गाना' हा त्यांचा मंत्र असे. पण दोघांनीहि मेहनत खूप केली. आतांच्या गायकांत व्यसनहि नाहीं, मेहनतहि नाहीं अन् खाणेंहि नाहींच नाहीं ! अशी वस्तुस्थिति आढळते.

### श्रोत्यांची कदर राखण्याची हौस

ध्रुपदधमाराप्रमाणें संगीतांतील सर्व गायनप्रकारांचा फैयाजखांनीं रसिकपणें परामर्श घेतला. ठुंबरी, दादरे, गझल, कवाली म्हणण्यांत त्यांना कमीपणा कधींच वाटला नाहीं. एखादा धमार तासभर छेडून ख्याल म्हटल्यावर, 'पानी भरेली' हा गाजलेला दादरा किंवा 'अब काली बदरियाँ आई' हें सावन-गीत, किंवा 'कत्ल मुझे कर डाला रामा' हा दादरे-वजा गझलहि ते तितकेच रंगून गात. याच्या मुळाशीं त्यांची निष्कपट रसीली वृत्ति व श्रोत्यांची कदर राखण्याची हौस दिसे. कोणी त्यांना असें हलकें गाणें गायल्याबद्दल छेडलें तर 'पेटके वास्ते सब करना पडता है' असें ते वरून म्हणत. तरी हें गायन चालूं असतांना त्यांचा रंगलेला मिज़ाज पाहिला कीं वरील कारण खोटें वाटूं लागे आणि कोणच्याहि गायनांतील रस चाखण्याची हपापलेली त्यांची रसलोलुप वृत्तीच जाहीरपणें दिसे. 'पेटके वास्ते' करणाऱ्या गायकाच्या चेहऱ्यावर 'मजबूरी' दिसते. ती फैय्याजखांमध्यें जरासुद्धां केव्हांहि दिसली नाहीं. पुण्याच्या संगीत-परिषदेमध्यें दरबारी गायल्या-वर 'अब् थोडा दादराभी होना चाहिये' असें म्हणून त्यांनीं 'कत्ल मुझे कर डाला' हा दादरा सुरू केला. 'सत्य वदे वचनाला नाथा' हें 'एकच प्याल्यां'तील लोकप्रिय पद याच दादऱ्याच्या चालीवर रचलें








गेलें आहे, हें खांसाहेबांना माहीत असल्यामुळें त्यांनीं मराठी श्रोत्यांना खूष करण्याकरितां हा दादरा रंगून म्हटला व संबंध श्रोतृगणाचा दुवा घेतला. याला म्हणतात श्रोत्यांची कदर करणें! खरा रसिक गायनाचा कोणताहि प्रकार उच्च-नीच मानीत नाहीं, अवगणीत नाहीं. सर्व प्रकारांतील ती ती मजा, ती ती लुत्फ, तो तो रस तो मजेनें चाखतो. जीवनामध्यें सर्व प्रकारच्या संगीताला स्थान आहे, जागा आहे याची त्याला जाणीव असते. म्हणूनच त्याला सर्वप्रकारच्या संगीताचें खरें मोल कळलेलें असतें. तो कोत्या मनाचा नसतो. 'अमृतमंथना'ची हिंदी आवृत्ति पाहिल्यावर फैयाजखां घरीं आले तेव्हां हार्मोनियम घेऊन त्यांतील 'रात आई है नया रंग जमानेके लिए' हा शांता आपटेनें म्हटलेला गझल तासभर तऱ्हेतऱ्हेनें छेडीत बसले होते असें दुसऱ्याच दिवशीं त्यांचा शिष्य महंमद बशीर मला सांगत होता. रसीली वृत्ति ती हीच! या वृत्तीच्या अभावामुळें आमच्यांतील कित्येक गायक 'रूखे' राहिलेले दिसतात. ते ख्यालसुद्धां रंगून गात नाहींत. गाण्यांत रंग येणें म्हणजे काय हें त्यांच्या गांवींहि नसतें. दुसऱ्या गायकाच्या मैफलींत हे हजर असले अन् मैफल रंगली तरी यांचे चेहरे भकास, नाहीं तर सुतकी दिसतात. इतर श्रोते तृप्त चेहऱ्यानें व अंतःकरणानें 'मजा आला बुवा' असे उद्गार काढीत मैफलींतून बाहेर पडतात तेव्हां हे माफीच्या साक्षीदाराप्रमाणें तोंड चुकवीत तेथून निसटतात! संगीताचा मूळ हेतूच यांना माहीत झालेला नसतो. एकंदर जीवनांतच यांची स्थिति 'इतो भ्रष्टस्ततो भ्रष्टः।' अशी असते. असे गायकच खऱ्या रसील्या गायनाचे शत्रू असतात. त्यांना खूप समाधान वाटतें, आपण अमक्या खांसाहेबाला गझल-कवाली गातो म्हणून छान छेडला! पण त्याला छेडण्याऐवजीं ते स्वतःलाच रसापासून पारखे करून घेतात, हें त्यांच्या ध्यानींहि येत नाहीं. बिचारे कूड!

गझल-कव्वाली गायन म्हणजे आपल्याकडील भजनगायनच होय! परमेश्वराची (अल्लाची) स्तुति व आळवणी त्या काव्यांत असते. मुसलमान कवि परमेश्वर व भक्त यांचें नातें आशकमाशुका-प्रमाणेंच मानून आपली कव्वाली (भजनें) रचतो. आणि चांगले चांगले गवई हें काव्य—या कव्वाल्या रंगून गातात. बडे महंमदखाँ हे उत्तम 'कव्वाल' होते. म. अल्लादियाखाँ यांचे बंधु हैदरखाँ, म. नथ्थनखाँ हे मोहरममध्यें 'मर्सीया' (हसन-हुसेनवरील शोकगीतें) उत्तम गात असत. अजूनहि जालंदरचे प्रख्यात गवई मुबारकअलीखाँ, फतेअलीखाँ लाहोर रेडियोवर गुरुवार-शुक्रवारीं आपल्या साथीदारांसह ढोलकावर ऐकण्यासारखी कव्वाली गातात. आमच्या इकडील गवई अष्टपदी गातांना, पंक्तींत श्लोक म्हणतांना त्यांना कमीपणा वाटत नाहीं. कव्वाली गायनाला हलके मानणारे अज्ञहि तर आहेतच, पण मूर्खहि आहेत. फैयाजखां-प्रमाणेंच भास्करबुवा, मंजीखां यांना ठुंबरी, पदें गावयाला कधींहि कमीपणा वाटला नाहीं. मंजीखां तर भावगीतेंहि उत्तम गात हें महशूरच आहे.

## 'प्रेमपिया' चिजांमुळें अजरामर

'प्रेमपिया' या नांवानें फैयाजखाँसाहेबांनीं पुष्कळ चिजा रचलेल्या आहे. त्यांतल्या मला जेवढ्या मिळाल्या आहेत, त्या त्रितालांतील असून त्यांच्या गायकीच्या विशिष्ट ढंगानें परिपूर्ण आहेत. 'मोरे मंदर अब लो' ही चीज या (जयजयवंती) रागांतील अनेक जुन्या चिजांहूनहि उठावदार आहे. 'चलो हटो जावो सैयाँ' हा सोहोनींतील दादरा अद्वितीय आहे. 'अँखियाँ उनसो लाग रही' ही झिंजोटींतील त्रितालांतील चीज ढंगदार असून अशी दुसरी चीज ऐकण्यांत नाहीं. 'अय् मोरी छांडो' ही सुगराई-मधील चीज सुरू होतांच गायकाला मैफल ताब्यांत घेतां येते, अशी हिची ढंगदार रचना आहे. तयार गळ्याच्या गायकानें रंग मारावा अशीच लज्जतदार ही चीज आहे. 'कैसे कर राखूँ जिया' हा शाम-कल्याणांतील छोटा ख्याल लयीच्या त्रितालामधें गाण्यास अत्यंत मधुर आहे. 'सगरी उमरिया मोरी' ही बिंद्राबनी—सारंगांतील चीज लयीला आड असून लयींत मुरलेला गायक गाऊं लागला तर हां हां म्हणतां रंग भरून ती लयीला अगदीं सोपी करून दाखवितो. या चीजांच्या रचनेंत खांसाहेबांची कल्पकता, लयबद्धता, रसीलेपणा, ढंग, बहुश्रुतता हीं पुरेपूर ओतलीं गेलीं आहेत. त्यांच्या "मैं कर आयी

पियां संग रंगरलियाँ ', या पूरिया रागांतील चिजेचें कराचीचे कै. शेठ लखमीचंद ईसरदास यांनीं स्वतः घेतलेलें ग्रामोफोन रेकॉर्ड ( दहा मिनिटांचे ) मा. मनहर बर्वे यांच्याजवळ आहे. आणखी त्यांचीं एकदोन अशींच रेकॉर्डस् त्यांच्या संग्रहांत आहेत. मास्टर्स व्हॉईस कंपनीनें पंधरा वर्षांपूर्वी त्यांच्या रेकॉर्डस् घ्यायला हव्या होत्या. त्या वेळीं ते ऐन उमेदींत दमदार गात असत. हिंदुस्थान कंपनीनें त्या काळांत घेतलेल्या रेकॉर्डस्मध्यें तोडी ( 'गरवा मैं संग लागी' ), परज ( 'मनमोहन' ), नटबिहाग ( झन् झन् झन् पायल ) या रागांच्या रेकॉर्ड्स उत्तम असून त्यांत खांसाहेब दिसतात. त्या मानानें ' बनावो बतियाँ ' हा रंगीला दादरा रंगला नाहीं. या रेकॉर्ड्सचें रेकॉर्डिंग मा. व्हॉ. कंपनीच्याइतकें सुबक नसूनहि त्या ऐकायला बऱ्या आहेत. खानदानी चिजांचें रेकॉर्डिंग करतांना गायकाची तबियत पाहून रोज एकदोनच घेतल्या तरच त्या उत्तम उतरतात. या दृष्टीनें केसरबाईच्या रेकॉर्ड्सचें ध्वनिमुद्रण अत्युत्तम झालें आहे. तें घाईनें उरकलेलें वाटत नाहीं. तसेंच फैयाजखांनीं दिलेल्या 'रामकली'चेंहि ध्वनिमुद्रण उत्तम झालें आहे, पण वयपरत्वें त्यांच्या गळ्याच्या घुमाऱ्याचा जोर व तानआलापातील कस राहिला नाहीं. हें उतरलेल्या गायनांत स्पष्ट दिसतें. म्हणूनच हें ध्वनिमुद्रण पंधरा वर्षांपूर्वी व्हावयाला हवें होतें.

खांसाहेबांनीं रचलेल्या अनमोल चीजांचें ध्वनिमुद्रण सांगोपांग करून घेणारी एकहि शैक्षणिक संगीत-संस्था नाहीं. अशा संस्था नसल्यामुळें कै. भास्करबुवा, केशवराव भोसले, बाळकृष्णबुवा, अल्लादियाखां, मीयाँजान, कालेखां, उमरावखां, हाफीजखां, बशीरखां यांसारख्या अव्वल दर्जाच्या कलावंतांचें गाणें रेकॉर्डच्यारूपानेंसुद्धां मागें राहिलें नाहीं, हें या कलेचें केवढें दुर्दैव ! बडोदा, ग्वालेर, इंदोर, कोल्हापूर येथील संस्थानिक संगीतावर पैसा खर्च करीत असूनहि त्यांना एवढें कार्य करण्याचें जमलें नाहीं. म. रहिमतखांची एडिसनच्या ग्रामोफोनवरील बांगडी परवांच मा. कृष्णरावांच्या घरीं ऐकतांना तिच्यांतील मधुर दाणेदार तयार तान ऐकून तर मला फारच चुटपुट लागली कीं, अशा रूपानें वरील कलावंतांचें गाणें राखून ठेवण्याचें कोणालाच कसें जमलें नाहीं ? झोराबाई, म. अब्दुल करीमखां, मौजुद्दीनखां, जानकीबाई, गौहरजान, मलकाजान यांचे थोडे नमुने या रूपानें मागें राहिले; पण वरील किती तरी कलावंतांचें गाणें त्यांच्याबरोबरच गेलें ! फैयाजखांनीं वरीलप्रमाणें उत्तमोत्तम चीजा रचून त्या आपल्या शिष्यांस पढविल्यामुळें अभिजात संगीतांत बहुमोलाची भर या नवरचनेमुळें झाली. सदारंग—अदारंग—मनरंगांप्रमाणें 'प्रेमपिया'हि चीजांमुळें अजरामर झाले आहेत.

फैयाजखांचे शिष्य हयात पुष्कळ आहेत. पण त्यांचा ढंग आणि रसीलेपणा दुर्दैवानें एकांतहि उतरला नाहीं ! श्री. रातंजनकरांसारखे जाणते शिक्षित विद्यार्थीहि खांसाहेबांच्या सोबतींत राहूनसुद्धां ' रूखे 'च राहिले याचें आश्चर्य वाटतें ! त्यांच्या गाण्यांत खांसाहेबांचा ढंगहि नाहीं अन् रंगहि नाहीं. तंत्र मात्र खूप आहे, सरगम तयार आहे, याददास अच्छी आहे, पण गाण्यांत प्रेम नाहीं. महंमदबशीरमध्यें खांसाहेबांचा ढंग होता पण बिचारा अल्पवयी ठरला. शराफतमध्यें हा ढंग आहे, परंतु अलीकडे तो कुठें आहे व त्याचा रियाज़ चालू आहे कीं नाहीं, हें कळत नाहीं. एवंच, खांसाहेबांचें गाणें जिवंत रूपानें एकाहि शिष्यामध्यें नाहीं ही दुर्दैवाची खरी कहाणी आहे ! खांसाहेबांच्या मृत्यूनें ध्रुपद गेला, धमारहि गेलाच ! पण ख्यालाचा ढंगदार अस्ताई-अंत्राहि गेला !! ही हानि न भरून निघणारी आहे. रंगीले घराण्याचें रंगीलें गाणें आतां ऐकावयाला मिळावयाचें नाहीं. त्या रात्री आणि त्या रंगदार मैफली यांच्या नुसत्या आठवणीच काढावयाच्या ! ! !

---

भक्त आपली प्रार्थना आपल्या आराध्यदेवतेसमोर ज्या पद्धतीनें प्रस्तुत करतो, त्याच पद्धतीचें अनुकरण म्हणजे शास्त्रीय संगीत होय. उस्ताद फैयाजखां ज्या वेळीं ठुमरी गात, तेव्हां ते इतके कांहीं तल्लीन होऊन जात कीं, जणूं ते स्वतः राधा असून आपल्या कन्हैयाशीं प्रेमालाप करीत आहेत, असा भास होई.

—महात्मा भगवान दीन, संपादक, ' नया हिन्द ' अलाहाबाद

आचार्य शं. द. जावडेकर

# योगी अरविंद यांच्या पुण्यस्मृतीस

आश्चर्यवत्पश्यति कश्चिदेनं आश्चर्यवत् वदति तथैव चान्यः ।
आश्चर्यवच्चैनमन्यः शृणोति श्रुत्वाप्येनं वेद न चैव कश्चित् ।।

—भगवद्गीता

नावेद्यमपि परोक्षं भवति ब्रह्म स्वयंप्रकाशत्वात् । सत्यं ज्ञानं
अनन्तं ब्रह्मेत्येतत्तस्य लक्षणं प्रथते ।।

—शंकराचार्य

योगिराज

आपला जन्म इ. स. १८७२ सालीं झाला. पूज्य बापूजींच्या नंतर तीनच वर्षांनीं आपण जन्मास आलां, आणि त्यांच्या निधनानंतर तीनच वर्षांच्या आंत आपलें देहावसान झालें. आपण जन्मास आलां, तेव्हां हा देश ब्रिटिशांचा गुलाम होता आणि आपण जेथें देह सोडलांत, त्या पाँडेचरीसारखीं कांहीं ठिकाणें फ्रेंचांचीं व कांहीं पोर्तुगीजांचीं गुलाम आहेत. ही फ्रेंच व पोर्तुगीज साम्राज्य-शाही अद्यापि नष्ट झाली नाहीं म्हणूनच आपण या स्वतंत्र भारतांत आला नाहीं काय ? पण आपण आज तेथेंहि देहरूपानें उरला नाहीं. आपली आत्मज्योति त्या शान्त तेजांत विलीन झाली. हें शान्त तेज देशकालांनीं विभागलेलें किंवा मर्यादित झालेलें नाहीं, तें अनंत आहे, तें चैतन्यमय आहे, असें त्याचें वर्णन भर्तृहरीनें केलेलें आहे. कोणत्याहि देशांतील व कोणत्याहि कालांतील मानवाला आपल्या प्रयत्नांनीं ती शान्ति आणि ती तेजस्विता प्राप्त करून घेतां येते, असाच याचा अर्थ ना ? ती शांति व ती तेजस्विता आपण प्राप्त करून घेतली होती. यामुळें आपलें जीवन सर्व जगाला पूज्य आणि आदरणीय वाटलें.

आपण जन्मलां तेव्हां आम्ही सर्वस्वींच गुलाम बनलों होतों. आमचा स्वाभिमान नष्ट झाला होता. एखाद्याच्या पोटीं असामान्य बुद्धिमत्तेचा पुत्र जन्मास आला, तर त्याला आय्. सी. एस्. करावें, येवढीच आमची मनीषा असे. सामान्य कुटुंबांत सामान्य बुद्धीचा मुलगा मामलेदार व्हावा आणि त्यानें स्वकुलाचा उद्धार करावा आणि असामान्य बुद्धीचा तेजस्वी हिरा निपजला, तर त्यानें कलेक्टर होऊन आपल्या कुलाचा उद्धार करावा, यांतच त्या वेळीं कृतार्थता मानली जाई. आपल्या वडिलांनीं आपलें हेंच स्थान योजिलें होतें. पण योगायोगानें आपण








तें स्थान मिळवूं शकलां नाहीं. त्या वेळीं आपल्या आप्तेष्टांची किती निराशा झाली असेल !

पण सयाजीरावमहाराज यांनीं आपल्या बुद्धिमत्तेचें चीज करण्याचें ठरविलें. ते एक राष्ट्रीय वृत्तीचे संस्थानिक होते. त्या वेळीं राष्ट्रीय वृत्ति हा अविवेक समजला जात होता. ब्रिटिशांच्या मतें तो गुन्हाच होता. पण व्यवहारी माणसाला अविवेक आणि राज्यकर्त्यांना गुन्हा म्हणून वाटणारा हा राष्ट्रीयत्वाचा सद्गुण त्या वेळीं आपणां-मध्यें दुर्दम्य स्वरूपांत प्रकट होऊं लागला होता. त्या वेळीं राष्ट्रीयत्व हेंच आपलें 'ब्रह्म' बनलें होतें. त्या वेळीं ही राष्ट्रीयत्वाची प्रेरणा म्हणजेच जगन्मातेचा साक्षात्कार अशी आपली भावना झाली. ही राष्ट्रीयत्वाची जोपासना आपण बडोद्याच्या तरुण विद्यार्थ्यांच्या मनांत करीत असतां आपणांस बंगालमध्यें हें राष्ट्रीयत्व क्रांतिकारक स्वरूपांत प्रकट झालेलें दिसलें. तिकडे आपण खेंचलें गेलां.

बंगालमध्यें १९०५-१० च्या दरम्यान भारतीय राष्ट्रीयत्व कालीमातेच्या रूपानें प्रकट होऊं लागलें; आधुनिक भारतांत निर्माण होणारी ही राष्ट्रशक्ति जगांत एक आध्यात्मिक बल निर्माण करीत आहे, अशी आपली निष्ठा बळावूं लागली. पांचशें वर्षांपूर्वीं युरोपांत एक नवजीवन निर्माण झालें, त्याहून श्रेष्ठ आणि व्यापक असें एक आध्यात्मिक नवजीवन आधुनिक भारतांत निर्माण होत आहे, अशी घोषणा आपण केली. वंगभंगाच्या चळवळींत निर्भेळ स्वातंत्र्याची प्रेरणा प्रथम आपणच निर्माण केली. स्वदेशी, राष्ट्रीय शिक्षण, बहिष्कार आणि स्वातंत्र्य ही राष्ट्रीय पक्षाची चतुःसूत्री आपणच ठरवून दिली. बहिष्कारयोग आणि निःशस्त्र-प्रतिकार या साधनांनीं भारताला संपूर्ण स्वातंत्र्य प्राप्त करून घेतां येईल ही श्रद्धा प्रथम आपणच बोलून दाखविली :

" On your fidelity to Swadeshi, to Boycott, to Passive Resistance rests the hope of a peaceful and spiritual salvation. On that it depends whether India would give the example unprecedented in history of a revolution worked out by moral force and peaceful pressure. "

हे आपले शब्द भारताच्या इतिहासांत सुवर्णाक्षरांनीं लिहिलेले आहेत. पण हे शब्द पुरे करण्याचें कार्य आपणांस सोडावें लागलें. आपणांवर बॉंबकटाचा खटला भरला होता त्यांतून आपली मुक्तता झाली. तरीहि आपणांस हद्दपार करण्याचा निश्चय सैतानी सत्तेनें केला होता. पण या सैतानाकडे पाहण्याचीहि आपली दृष्टि सामान्य मनुष्यांच्या दृष्टीहून भिन्न बनली होती. हा सैतानहि परमेश्वराचेंच कार्य करीत आहे, या वृत्तीचा साक्षात्कार आपणांस झाला. वासुदेव-श्रीकृष्ण आणि कंस-जरासंध ही सर्व एकाच भगवंताची लीला आहे, असें आपण बोलत होता. " या अपूर्व लढ्यांतून एक अभिनव आध्यात्मिक क्रान्ति जगांत घडून येईल. पण तुम्ही आपली निर्भेळ स्वातंत्र्यावरील, बहिष्कारावरील आणि निःशस्त्रप्रतिकारावरील निष्ठा अव्यभिचारी ठेवा " असा संदेश देऊन आपण राजकीय क्षेत्राचा निरोप घेतलां !

आपण एक राष्ट्रीय पक्ष निर्माण केला; त्याला एक कार्यक्रमहि दिला.








पण त्या पक्षाचें नेतृत्व सोडून आपण दुसरीकडे गेलां. तसं करणें त्या वेळीं आपणांस अपरिहार्यच होतें. त्या वेळीं राष्ट्रीय पक्षाला आपण पुढील दिलासा दिलांत :

" All great movements wait for their God-sent leader and only when he comes, move forward triumphantly to their fulfilment. The men, who have led hitherto, have been strong men of high gifts and commanding genius, great enough to be the protagonists of any other movement; but even they were not sufficient to fulfil one which is the chief current of a worldwide revolution. Therfore the nationalist party, custodians of the future, must wait for the man who is to come, calm in the midst of calamity, hopeful under defeat, sure of eventual emergence and triumph and always mindful of the responsibility which they owe not only to their Indian posterity but to the world."

या आपल्या अखेरच्या संदेशांत " तुमचें क्रांतिकार्य पुरें करणारा आणि या क्रांतींतून जगत्क्रांतीचा मार्ग प्रज्वलित करणारा नेता परमेश्वर तुम्हांस देईल " असें आश्वासन देऊन आपण त्या परमेश्वराच्या शोधासाठीं पॉंडेचरीस निघून गेलां !

हे आपले उद्गार १९०९ च्या जुलैंतील आहेत. त्याच वर्षाच्या डिसेंबरांत बापूजींनीं मद्रास येथें भरलेल्या राष्ट्रीय सभेला पुढील संदेश दक्षिण आफ्रिकेंतून पाठविला होता :

" May I also suggest that in pondering over and concentrating our attention on passive resistance such as has been described, we would perchance find out that, for the many ills we suffer from in India, passive resistance is an infallible panacea. It is worthy of careful study, and I am sure it will be found that it is the only weapon that is suited to the genius of our people and our land, which is the nursery of the most ancient religions and has very little to learn from modern civilization-a civilization based on violence of the blackest type, largely a negation of the divine in man and which is rushing headlong to its ruin."

आज आम्ही हे शब्द वाचूं लागलों म्हणजे आम्हांला असें वाटतें कीं, आपण जो नेता आमच्या राष्ट्रीय आंदोलनास परमेश्वर पाठवील असें म्हणालांत तो हाच नेता असावा. पण १९०९ च्या मद्रास-कॉंग्रेसला जमलेल्या प्रतिनिधींना या शब्दांत इतका अर्थ दिसला असेल काय ? मद्रासची १९०९ ची कॉंग्रेस म्हणजे राष्ट्रीय पक्षाला जिनें बाहेर काढून लाविलें अशी प्रागतिकांची सनदशीर कॉंग्रेस. या वेळीं टिळक मंडालेंत होते; आपण, अरविंद बाबू, पॉंडेचरीच्या वाटेवर होतां.










## योगी अरविंद यांच्या पुण्यस्मृतीस

या काँग्रेसमध्यें वरील संदेश वाचला गेला तेव्हां "आधुनिक संस्कृति ही काळ्याकुट्ट हिंसावादावर आधारलेली आहे आणि ती मोठ्या वेगानें आत्मघाताच्या दरीकडे धांव घेत आहे आणि यांतून मानवसंस्कृतीला बचाविण्याचें कार्य करण्याचें सामर्थ्य या 'निःशस्त्रप्रतिकाराच्या साधनां'त आहे" हे विचार थोडे हास्यास्पदच वाटले असतील !

पण आम्हांस ते शब्द यथार्थ वाटतात. पुढें बापूजी हिंदुस्थानांत आले. त्यांनीं, योगिराज, आपण शिकविलेल्या बहिष्कारास 'असहकार' असें नांव दिलें आणि 'निःशस्त्रप्रतिकार ( passive resistance )' याला 'सत्याग्रह' हें नांव दिलें. या 'असहकारा'नें व 'सत्याग्रहा'नें संपूर्ण स्वातंत्र्य मिळूं शकेल, हें आतां सर्वांना पटूं लागलें. कारण तें त्यांनीं बहुतांशीं करूनच दाखविलें.

पण त्यांचें स्वराज्य, त्यांचें 'रामराज्य', त्यांचें तें 'आत्मराज्य' अद्यापि दूरच आहे. आतां आम्हांस समाजवादाची, शेतकरी-कामकरी राज्याची, समाजसत्ताक लोकशाहीची तहान लागली आहे. बापूजींनीं सांगितलें कीं, 'हेंहि ध्येय तुम्हांस अनत्याचारी असहकारानें व सत्याग्रहानें मिळेल'. आमच्यापैकीं पुष्कळांच्या बुद्धीला अद्यापि हें पटत नाहीं. तेंहि जनतेनें करून दाखविलें म्हणजे पटेल. जनतेला योगिराज अरविंद आणि म. गांधी यांच्यांतील भेद समजत नाहीं. तिला निष्ठा वाटते कीं, आपण याच थोर मार्गानें गेलों, तर आपणांस हींहि साध्यें प्राप्त होतील. ही जनतेची निष्ठा, योगिराज, आपण व महात्माजींनींच निर्माण केली ना ?

ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति ।
भ्रामयन् सर्वभूतानि यंत्रारूढानि मायया ॥
तमेव शरणं गच्छ सर्वभावेन भारत ।
तत्प्रसादात्परां शांतिं स्थानं प्राप्स्यसि शाश्वतम् ॥

बापूजींनीं व, योगिराज, आपण आम्हांस या श्लोकांचा अर्थ समजावून सांगितला. आपण ती 'परा शांति' आणि तें 'शाश्वत स्थान' प्राप्त करून घेतलें अशी आमची खात्री झाली. सुमारें अडीच-तीन हजार वर्षांपूर्वीं होऊन गेलेले श्रीकृष्ण, गौतम बुद्ध व महावीर हे धर्मपुरुष कसे असावेत व त्यांनीं आपला प्रभाव कोणत्या सामर्थ्यानें पाडिला असेल याचा कांहींसा प्रत्यय आपण आणून दिला.

आपणांस दिसणारें तें दिव्य तेज आमच्याहि अंतःकरणांत आहे, आणि आपण प्राप्त करून घेतलेली शांति आम्हांसहि प्राप्त करून घेतां येईल, ही निष्ठा, योगिराज, आपण जागृत केली. या आपल्या ऋणांतून आम्ही कधीं उतराई होऊं ? आपलें तें आध्यात्मिक जगत्क्रांतीचें कार्य भारतीयांच्या हातून तडीस जावो, हीच उत्कट इच्छा आपल्या पुण्यस्मृतीस आदरांजलि अर्पण करतांना व्यक्त करतों.

---

ज्यांनीं आपल्या हातांत सर्जनशील चिच्छक्तीचें धनुष्य पक्कें धरून सुसज्ज ठेविलें होतें, अशा थोर महर्षींपैकीं श्रीअरविन्द घोष हे शेवटचे होत. —रोमाँ रोलाँ



अनुक्रमणिका

श्री. प्रेमा कंटक

# सरदार वल्लभभाई पटेल : पुण्यस्मरण

विसाव्या शतकाच्या पहिल्या पंचविशींत " लाल-बाल-पाल " या त्रिमूर्तीशीं आपला देश परिचित झाला होता. दुसऱ्या पंचविशींत " महात्माजी-सरदार-जवाहरलालजी " ही त्रिमूर्ति त्याचें आराध्य दैवत बनली. आज तिच्यापैकीं दोघांची जीवन-ज्योत मालवली आहे.

महात्मा गांधींची भूमिका आध्यात्मिक होती. जवाहरलालजींची वैज्ञानिक म्हणतां येईल. सरदारांनीं राजनैतिक भूमिका सांभाळली ! राजकारण त्यांनीं कर्मयोग्याप्रमाणें चालविलें. महात्माजी-सारखा तेजोराशि त्यांचा मार्गदर्शक नेता बनल्यावर त्यांचें जीवन एखाद्या तेजःपुंज दीपशिखेप्रमाणें पेटत राहिलें. देशाचें पारतंत्र्य, देशांत होणारा अन्याय हीं दूर करण्यासाठीं, न्यायाचें राज्य देशांत स्थापण्यासाठीं महात्मा गांधी झुंजत राहिले. त्या प्रचंड संग्रामांत सरदारांनींही उडी टाकली व शेवट-पर्यंत ते सरदारच राहिले !

सरदारांच्या राजकीय जीवनाचे दोन खंड पडतात : स्वातंत्र्यसंग्रामांत नेत्यांच्या भूमिकेवरून त्यांनीं केलेली कामगिरी व स्वातंत्र्य मिळाल्यानंतर समर्थ मुत्सद्दी या नात्यानें त्यांनीं केलेली राज्यकारभाराची वहिवाट. या दोन्ही भूमिकांवरून त्यांच्या अंगचे अतुल गुण " शौर्यं तेजो धृतिर्दाक्ष्यं युद्धे चाप्यपलायनम् " हे राष्ट्राच्या प्रचीतीस आले होते व म्हणूनच त्यानें सरदारांना " वज्रपुरुष " अशी संज्ञा दिली होती. पण सरदारांच्या व्यक्तिमत्त्वाची दुसरी बाजू समाजाच्या दृष्टीसमोर फारशी कधीं आलीच नाहीं. त्यांच्याशीं निकट संबंध ठेवणाऱ्या थोड्या व्यक्तींनाच ( त्यांची संख्याहि कमी नाहीं ) त्या बाजूचा परिचय होत असे, व म्हणून कालिदासाच्या आदर्श राजाप्रमाणें ते " अधृष्यश्चाभिगम्यश्च " असल्याची त्यांना प्रतीति येई.

**' बहिणीचें कसें होईल ? '**

सरदारांत कवीचें हृदय नसेल पण मानवी हृदय जरूर होतें. वैयक्तिक व सामाजिक सुखदुःखांचे प्रतिध्वनी त्यांतून निघत. अहमदाबादचे सुप्रसिद्ध डॉक्टर कानुगा यांच्या प्रेमळ व वत्सल पत्नी श्री. नन्दूबेन यांच्याबद्दल सरदारांच्या मनांत उच्च व कोमल प्रकारचा भगिनीभाव होता. लाहोर-कॉंग्रेस-समयीं डॉ. कानुगा खूप आजारी होते. खबर कळतांच सरदार अस्वस्थ झाले. लाहोरच्या बैठकीकडे त्यांचें लक्ष लागेना. " माझी एकुलती एक बहीण, तिचें कसें होईल ! " या विचारानें ते तळमळूं लागले. महात्माजींनीं त्यांना तातडतोब अहमदाबादेस पाठवून दिलें ! कानूगांच्या घरीं पोंचल्यावर ते खालींच सोप्यांत येरझाऱ्या घालूं लागले. आंत जाण्याची त्यांची हिंमत होईना किंवा जिच्यासाठीं धांवत आले तिची भेट घेऊन तिचें सांत्वन करणेंहि त्यांच्यानें झालें नाहीं. खुद्द नन्दूबेन शान्त व स्वस्थ होत्या. सरदार आलेले कळतांच त्यांनींच बाहेर येऊन त्यांना धीर दिला. डॉ. कानुगा नंतर आजारांतून उठले; पण सरदारांना दुःखाच्या कल्पनेनें भाराक्रान्त केलें हें ही घटना सिद्ध करते.

सरदारांनीं स्वतःचें चरित्र कधींच लिहिलें नाहीं. लेखनाची त्यांना आवड नव्हती. " निजगुणकथा-पातक " आपल्या हातून होण्याचें टाळण्याची भावनाहि असेल. पण एकदां ते मजजवळ बोलून गेले होते : " इतिहास लिहिण्यापेक्षां निर्माण कर-

ण्यांत अधिक पुरुषार्थ नाहीं का ? " त्यांच्यांत आत्मप्रौढि नव्हती पण आत्मविश्वास होता, स्वतः च्या मर्यादेचें भान होतें.

## ' आपला जय असो '

सरदारांशीं माझा परिचय १९२८ सालीं प्रथम झाला. त्यांच्या संस्मरणांतून नीतिबोधापेक्षां हृदय-परिचय अधिक होऊं शकेल. मी त्या वेळीं एम्. ए. च्या टर्म्स भरीत होतें आणि त्याच वेळीं बारडोलीची चळवळ सुरू झाली होती. मुंबईत आम्हीं विद्यार्थ्यांनीं मिरवणूक, सभा, प्रचार व निधि जमविणें वगैरे गडबड चालविली होती. जमविलेला निधि खुद्द सरदारांना अर्पण करावा म्हणून त्यांना आमंत्रण देण्यांत आलें. त्याप्रमाणें ते आले. त्याच वेळीं मला त्यांचें प्रथम दर्शन झालें, अशी छाप मनावर नाहीं. परंतु प्रभाव मात्र पडला खरा. त्यांच्या भाषणांतील पहिलें वाक्य हें होतें:— " विद्यार्थ्यांनो, तुम्ही आज एक महत्त्वाची गोष्ट शिकलांत, ती म्हणजे शिस्त. शिस्तीशिवाय चळवळ व्यर्थ आहे. "

माझ्या आठवणीप्रमाणें फोर्टमधील एक्सेल्शिअर थिएटरांत मोठी सभा भरविण्यांत आली व त्यांना निधि अर्पण करण्यांत आला. ते व्यासपीठावर प्रमुख आसनावर बसले होते व मी दुरून गंमत पहात होतें. या साऱ्या धांदलींत मींही उत्साहानें आपला वांटा उचलला होता, जसा इतर अनेकजणांनीं उचलला होता. एकाएकीं सभा-संचालकांकडून मला बोलावणें आलें : " तुमच्या हस्तें निधीचें ताट सरदारांना अर्पण करावयाचें आहे. पुढें या. " हे शब्द ऐकतांच मी तर बावरीच झालें ! ते केवढे थोर पुरुष ! मी किती क्षुद्र ! अशी भावना मनांत उत्पन्न झाली. मी संकोच करूं लागलें. पण माझें कांहीं न चालतां रुपयांनीं भरलेलें ताट माझ्या हातांत देण्यांत आलें. मनांत अनेक भावनांचा मुग्ध गोंधळ चालला असतांना मी त्या भव्य सभेंत व्यासपीठावर त्या धीरगंभीर पुरुषासमोर आलें. त्यांना तिलक केला व " आम्ही आपणांस जय इच्छितों " असे शब्द भिडस्तपणें उच्चारून त्यांच्या हातीं ताट दिलें. गोड हास्य करीत त्यांनीं त्या निधीचा साभार स्वीकार केला ! हीच त्यांची माझी प्रथम भेट !!

त्यानंतर आज बावीस वर्षे गेलीं ! त्या समयांत किती तरी अद्‌भुत व असाधारण घटना घडल्या ! महात्माजींच्या छत्राखालीं गेल्यावर सरदारांशीं वारंवार संबंध येणें अपरिहार्य होतें. सरदारांच्या प्रथम भेटीनंतर थोड्या दिवसांनीं मी बारडोलीस जाऊन आलें होतें. तेव्हांहि त्यांनीं ओळख दाखवून अगत्यानें माझी विचारपूस केली होती. १९२९ मध्यें मी साबरमतीस सत्याग्रहाश्रमांत प्रवेश केला. त्यानंतर एक दिवस नदीवरून कपडे धुऊन येतांना समोरून महादेवभाईसह सरदार आले. मला पाहून ते मुद्दाम थांबले व बोलूं लागले : ' येथें कसें काय वाटतें ? ' त्यांच्या वडील बंधूंचा खून झाल्याची खबर नुकतीच वाचली होती. मीं बालोचित जिज्ञासेनें त्यांना त्या घटनेसंबंधीं प्रश्न केला. त्यांच्या चेहेऱ्यावर कोणत्या भावना दिसतील, आवाजांत कोणता फरक पडेल, तें जाणण्यास मी उत्सुक होतें. पण तसा कांहींच फरक न होतां ते सहज म्हणाले : " होय. शेतकऱ्यांच्या भांडणाभांडणांत माझ्या बंधूंचा खून झाला. कुऱ्हाडीनें मान कापली. " त्या भयंकर घटनेबद्दल ते इतक्या निर्विकारपणें बोलूं शकतात त्याचें मला आश्चर्य वाटलें !

दांडी-कूचापूर्वींच त्यांना सरकारनें कारावासांत टाकलें होतें. आश्रमांत सायंप्रार्थना सुरू होण्यापूर्वीं ही खबर आली. कांहीं वेळानें त्यांना तुरुंगांत घेऊन जाणारी पोलिसांची मोटार आश्रमाच्या दाराशीं थांबली. महात्माजी भेटीस सामोरे गेले होते. आम्ही मंडळी मागें होतों. बोलणें झाल्यावर गाडी पुढें चालूं लागली, तों महादेवभाई ओरडून म्हणाले : " सरदार, आमच्या अगोदर जाण्याची घाई केलीत ? "—सायंकाळच्या अंधारांत मोटरींतून सरदारांचें मुक्त हास्य ऐकूं आलें.

येरवड्यास महात्माजी असतांना सरदार त्यांच्या जवळच होते. व मी जेव्हां महात्माजींच्या भेटीस जाई तेव्हां तेहि जवळच असत. त्यांच्या जवळच असत. त्या वेळीं त्यांचा विनोद वारंवार चाखावयास मिळे. मी कधीं कधीं रागानें त्यांना दुरुत्तरेंहि करीं. पण त्यांच्या हास्याशिवाय मला दुसरें प्रत्यु-








त्तर मिळत नसे. त्यांच्यांत प्रसन्न विनोदाची वृत्ति असाधारण होती. ते कधीं रागावलेले मीं पाहिले नाहींत. महात्माजी रागावत. मला संस्कार देण्यासाठीं वारंवार बोलतहि. पण सरदारांशीं कितीहि मोकळीक घेतली तरी त्यांना राग म्हणून येत नसे.

### प्रसन्न विनोदी वृत्ति

गांधी-सेवा-संघाचें संमेलन दरसाल सात दिवस भरत असें त्या वेळींही सरदारांची भेट होई व परिचय वाढण्याचे प्रसंग येत. आपण मोठे असाधारण पुरुष आहोंत अशा तोऱ्यानें ते कधींहि कोणाकडेहि वागले नाहींत. माझ्यासारखीं सामान्य माणसेंहि त्यांच्याजवळ बरोबरीच्या नात्यानें बोलूं शकत. पुढें पुढें त्यांच्या वात्सल्यभावाची प्रतीति मला सारखी येत गेली. पुण्यास अखिलभारतीय कॉंग्रेस-समितीचें अधिवेशन झालें तेव्हां महात्माजी हजर नव्हते. राजाजी व सरदार यांनीं महात्माजींच्या धोरणाविरुद्ध धोरण स्वीकारलें व समितीला आपल्या बाजूस ओढलें. त्या दिवशींचें सरदारांचें व्याख्यान मला बिलकूल आवडलें नाहीं. महात्माजींच्या विचाराविरुद्ध हे बोलतात कसे व त्यांच्या आज पर्यंतच्या धोरणाचा व मताचा हे विपर्यास करतात कसे, तें मला कळेना. बैठक स्थगित झाल्यावर मधल्या सुटींत ते व्यासपीठावर आडवे पडले असतांना मी तावातावानें त्यांच्याजवळ गेलें व त्यांची निर्भर्त्सना करण्यास आरंभ केला. ते शांतपणें हंसत उत्तरें देऊं लागले. माझा संताप अधिकच वृद्धिंगत झाला व 'शेषं कोपेन पूरयेत्' या न्यायानें त्यांना रागानें थपडा देण्यास व चिमटे घेण्यास मी सुरवात केली. एखादा भव्य व उमदा सिंह चिचुंद्रीशीं खेळत असावा त्याप्रमाणें ते माझे प्रहार झेलीत होते व हंसत होते. शेवटीं एवढेंच म्हणाले : "आम्ही कितीही म्हटलें तरी हें कोडगें इंग्रज सरकार आम्हांला थोडेंच काहीं देणार आहे !"

या वाक्यानें मात्र मी स्तिमित झालें. जर इंग्रजांच्या प्रामाणिकपणाचा विश्वास नाहीं, तर हें सहकाराचें धोरणच कशाला, असा विचार मनांत आला. तोहि काळ गेला ! सरदारांचें मन पुन्हा पालटलें व ते महात्माजींच्या मार्गदर्शनाखालीं आले. १९४१ च्या डिसेंबरांत बारडोलीच्या आश्रमांत आठवडाभर कॉंग्रेस वर्किंग कमिटीची बैठक चालू होती तेव्हां मी तेथेंच होतें. सरदारांच्या आंतड्यांचा आजार तेथें बळावला होता. पोटावर पट्टा व हातांत काठी अशा सरंजामांत ते चहूंकडे देखरेख ठेवीत फिरत. पण त्यांचें मुक्त हास्य व प्रसन्न वृत्ति यांचें दर्शन कांहीं कधीं चुकलें नाहीं. सर्वांची, महात्माजींची सुद्धां, ते मस्करी करीत. विस्तारभयास्तव त्या साऱ्या घटना व त्यांचे मार्मिक विनोद येथें देतां येत नाहींत.

### अद्‌भुत सहनशक्ति

१९४२ च्या चळवळीपूर्वीं महात्माजी पुन्हां जेव्हां कॉंग्रेसचे आगेवान् व सेनापति बनले तेव्हां सरदारांना मीं म्हटलें, "जिरलीच कीं नाहीं तुमची ? नाहीं म्हणत शेवटीं त्यांनाच शरण जावें लागलें !" सरदार लगेच म्हणाले : "छे ! छे ! वर्किंग कमिटीनेंच बापूंना प्रथम बाजूस काढलें व नंतरहि वर्किंग कमिटीनेंच त्यांना हुकूम केला कीं, सूत्रें हातीं घ्या व चळवळ सुरू करा."

मुंबईस त्यांचा मुक्काम मरीन ड्राइव्हवर असलेलेल्या त्यांच्या मुलाच्या निन्हाडीं असतांना एकदां सकाळीं श्री. शंकरराव देवांबरोबर त्यांच्या भेटीस मी गेलें होतें. नुकतीच त्यांची सकाळची न्याहारी झाली होती. आम्हांलाहि कांहीं खाद्यपेय घेण्याचा ते आग्रह करूं लागले. मी व्रती असल्यामुळें कांहीं घेऊं शकत नव्हतें. शंकररावांचा गाईच्या दुधाचा नियम होता. सरदार म्हणाले : "हें दूध कपिला गाईचें आहे ! घेण्यास हरकत नाहीं." एकच हंशा पिकला.

अहमदनगरच्या किल्ल्यांतून सरदार वीस वर्षांनीं म्हातारे होऊन बाहेर पडले. पहाडासारखी त्यांची देहयष्टि पण आंतड्याच्या आजारानें पोखरून गेली होती. त्या आजारानेंच शेवटीं त्यांचा बळी घेतला. कष्ट व त्रास सहन करण्याची त्यांची शक्ति अद्भुत होती. कितीहि वेदना झाल्या तरी ते तोंडानें हूं का चूं करीत नसत. गरजेची कसलीहि वस्तु मागत नसत. छायेप्रमाणें त्यांच्या जवळ असणारी त्यांची कन्या मणिबेन ही स्वतःच त्यांच्या गरजा आपल्या अंतःसंवेदनांनीं समजून त्या पुऱ्या पाडीत असे. तिच्याशीं सुद्धां ते वर्षानुवर्षें बोलत नसत. त्यांच्या घराण्यांत बालबोध








पद्धति होती. मुलीशीं बाप बोलत नसे कीं तिचे लाड देखील करीत नसे. हें मणिबेनकडून मला कळलें तेव्हां मला अत्यंत आश्चर्य वाटलें. कारण, मी त्यांची कन्या नसतांना मला त्यांचा अनुभव वेगळा आला होता ! त्यांच्या वात्सल्यानें मला त्यांची ओढ फार लागली होती.

## बापूंच्या मरणाचा धक्का

दिल्लीस गृहमंत्री म्हणून काम करूं लागल्यानंतर त्यांची माझी भेट फारशी होत नसे. मुंबईस आरामासाठीं ते दोनदां आले असतांना दोन्ही खेपेस त्यांची तास तास मुलाखत झाली होती. पहिल्या भेटींत त्यांच्या प्रकृतीबद्दल मीं चिंता व्यक्त केली तेव्हां ते सांगूं लागले : " बापूंच्या मरणानें मला फारच धक्का बसला. त्याचा परिणाम प्रकृतीवर झाला आहे. " मीं म्हटलें, " साहजिक आहे. आम्हांला दुःख झालें तर आम्ही तुम्हांजवळ मन मोकळें करून दुःख हलकें करूं. तुमचें दुःख तुम्ही कोणाकडे सांगाल ? मग आंतल्या आंत गुदमरल्यासारखें होत असेल." त्यांची कन्या लगेच म्हणाली : " तीच तर अडचण आहे. आणि हे आपलें दुःख कोणास सांगत नाहींत आणि आंतल्या आंत झुरत असतात. त्यामुळें तब्येतीवर परिणाम जास्त झाला आहे."

त्यांनीं पुष्कळ जगावें अशी इच्छा प्रदर्शित करताच ते म्हणाले, " आतां जगून काय करावयाचें ? माझें काम मीं केलें आहे." तें मला पटलें नाहीं. " माझी प्रकृति आतां काम करण्यालायक नाहीं. मी जवाहरलालला सांगतों कीं मला मोकळा करा. पण ते म्हणतात, ' नाहीं. तुम्ही राहिलेंच पाहिजे.' जवाहरलाल मागतील तेवढें काम दिलें पाहिजे, असें मीं ठरविलें आहे " असें ते नंतर म्हणाले.

" तुमच्याइतका कणखर निश्चयाचा व प्रखर इच्छाशक्तीचा दुसरा कोणी पुरुष वर्किंग कमिटींत आहे का ?" असा प्रश्न मी एकदां केला असतां चटकन् ते उद्गारले : " जवाहरलाल ! तो माझ्या इतक्याच निर्धाराचा मनुष्य आहे."

आपल्याशीं मतभेद असणाऱ्यांबद्दल त्यांना राग नसे. गुजरातच्या कार्यकर्त्यांनीं मला सांगितलें आहे कीं, " सरदार गुजरात प्रांतिक काँग्रेस कमिटीचे अध्यक्ष असतांना आम्हांस त्यांच्या समक्ष वाटेल तें बोलण्याची मुभा असे. विरोधी भावनांचा ते राग करीत नसत किंवा कधीं कोणास अटकावीत नसत. त्याची आम्हांला मुळींच भीति वाटत नसे. उलट आम्ही आपलें मन मोकळें करावें अशीच त्यांची इच्छा व प्रयत्न असे."

## कार्यकर्त्यांवर मायेची पांखर

नाशिकच्या काँग्रेस-अधिवेशनप्रसंगीं त्यांची शेवटची भेट झाली. व्यासपीठावर ते पहुडले असतांना बराच वेळ त्यांच्याशीं बोलण्याचें भाग्य मिळालें. प्रदर्शनांतून मी एक गुळाची टॉफी व साखरेची पुडी घेऊन गेलें होतें. मागून येऊन हळूच त्यांच्या हातात मीं ती ठेवली ! चमकून त्यांनीं मागें पाहिलें व मला पाहून हंसले. "तुम्हांला भेट म्हणून आणली आहे. खाल्ली पाहिजे " असें मी त्यांना आग्रहानें सांगितलें. त्यांनीं संमति दिली. काँग्रेसच्या अधिवेशनांत कामाची जबाबदारी शिरावर असल्यामुळें व सरदारांचा निवास फार दूर असल्यामुळें मी त्यांना भेटूं शकलें नव्हतें. पण त्यांना स्मरण झाल्याशिवाय कसें राहील ? "तूं कोठें होतीस ? मला भेटली नाहींस ? तुझी आठवण मी सारखी करीत होतों. शंकररावांकडेही चौकशी केली." असें ते म्हणाले. त्यांचा वात्सल्यपूर्ण हात माझ्यावर फिरला, तेव्हां मनाला खूप आनंद वाटला. महात्माजींच्या पश्चात् देशाचा सांभाळ करण्यांत ज्याप्रमाणें त्यांनीं जनतेला नेतृत्वाची उणीव फारशी भासूं दिली नाहीं, त्याप्रमाणेंच कार्यकर्त्यांवर मायेची पांखर घालण्यासहि ते विसरले नाहींत. दर खेपेस ते भेटले म्हणजे, ' हे पुन्हां दिसतील कां ? ' अशी भावना मनांत येऊन हृदय व्याकुळ होई. सरदारांनीं तरी पुष्कळ जगावें असें वाटे व म्हणूनच नाशिक स्टेशनवर आगगाडींत त्यांना निरोप देतांना अश्रुपूर्ण नेत्रांनीं मी त्यांना म्हटलें : " पुन्हां भेटा हो सरदार ! " जणूं काय मृत्यु त्यांना आतांच घेऊन जाईल अशा भावनेनें मी त्यांना घट्ट पकडून ठेवलें होतें. ते मला पोटाशीं धरून हंसत म्हणाले : " ईश्वराची इच्छा असेल तर भेटूं ! " पण

[ पुढील मजकूर पान ७२ वर पहा. ]







श्री. हरि कृष्ण मोहनी

# सरदार वल्लभभाई पटेल आणि काँग्रेस

सरदार वल्लभभाईंच्या मृत्यूमुळें काँग्रेस ह्या हिंदुस्थानव्यापी प्रमुख राजकीय संस्थेची अपरिमित हानि झाली आहे. सरदारांचें शरीर अलीकडे अनेक आपत्तींनीं जर्जर झालेलें होतें, आणि हिंदी जनतेच्या सामान्य वयोमानाप्रमाणें पाहतां सरदार हे पिकलेलें पान झाले होते, हें खरें. तथापि, काँग्रेस ही संस्था ज्या कठिण, बिकट व आणीबाणीच्या संक्रमणावस्थेच्या काळांतून सांप्रत जात आहे, त्याकडे लक्ष देतां त्यांच्या असामान्य धुरीणत्वाची काँग्रेसला आज अत्यंत गरज होती ह्यांत कांहीं शंका नाहीं. ज्या थोड्या असाधारण सामर्थ्यसंपन्न नेत्यांनीं काँग्रेसचा लौकिक हिंदुस्थानांतच केवळ नव्हे तर अखिल जगांत पसरविला, त्यांत वल्लभभाई हे अग्रेसर होते, हें कोणासहि कबूल करणें प्राप्त आहे.

महात्मा गांधींनीं गेल्या तीस वर्षांत जागतिक राजकीय इतिहासाचा परंपरागत ओघ बदलविणाऱ्या ज्या सत्याग्रहाच्या अभूतपूर्व आंदोलनाचें अभिमंत्रण केलें, त्या महान् कार्यांत महात्मा गांधीजींचे सरदार वल्लभभाई हे उजवे हात ठरावेत, इतकें प्रभावी साहाय्य या आंदोलनांत सरदारांनीं गांधीजींस केलें आहे. महात्मा गांधीजींच्या सत्याग्रही चळवळींत धार्मिक, सामाजिक, आर्थिक, शैक्षणिक व राजकीय असा सर्व प्रकारचा क्रांतिकारक कार्यक्रम सामावलेला असला, तरी त्या कार्यक्रमाचा केंद्रबिंदु हिंदुस्थानचें राजकीय स्वातंत्र्य हाच होता. आणि म्हणूनच हिंदुस्थानचें आसेतुहिमाचल असें जानपद समुत्थान त्यांना घडवून आणणें शक्य झालें. कारण राजकीय स्वातंत्र्य ही हिंदुस्थानची मुख्य गरज होती, हें आबालवृद्धांस प्रतीत होऊन चुकलें होतें.

## कृष्णार्जुनाची जोडी

सरदार वल्लभभाईंचा मूळचा स्वाभाविक पिंड क्षत्रिय मनोवृत्तीचा, ' शौर्यं तेजो धृतिर्दाक्ष्यं युद्धे चाप्यपलायनम्। दानमीश्वरभावश्च ' ह्या गुणांचा आविष्कार करणारा असा होता. महात्मा गांधींच्या ' शमो दमस्तपः शौचं क्षांतिरार्जवं ' ह्या ब्राह्मगुणांपेक्षां, महात्माजींची शौर्यशाली अशी सत्याग्रही वृत्ति, त्यांचा सविनय कायदेभंग, त्यांचें असामान्य असें युद्धतंत्र, अत्यंत बलाढ्य व राक्षसी शत्रुसेनेवर एकट्यानें चालून जाणारें महात्माजींचें भयंकर धाडसी तेज ह्याच गुणांनीं सरदारांचें युयुत्सु मन उत्स्फूर्त होणें अगदीं स्वाभाविक होतें. गुजराथच्या भूमीचें हे दोन असामान्य वीरपुत्र हिंदुस्थानच्या भाग्यानें एकत्र येऊं शकले; कृष्णार्जुनाप्रमाणें त्यांचा हिंदुस्थानाच्या उद्धारासाठीं एकजीव झाला. आणि म्हणूनच हिंदुस्थानाच्या ह्या दिव्य अहिंसायुक्त भारतीय युद्धामुळें सर्व जगाचें लक्ष हिंदुस्थानानें वेधून घेतलें.

खेडा, चंपारण्य येथील महात्माजींची रणनीति सरदार वल्लभभाईंनीं चिकित्सक बुद्धीनें अवलोकन केली होती. असहकाराचें महात्माजींनीं केलेलें हिंदुस्थानव्यापी आंदोलन सरदार वल्लभभाईंच्या शौर्यशाली मनांत खोल रुजलेलें होतें. महात्माजी हेच एकमेव अद्वितीय पुढारी हिंदुस्थानाचा उद्धार करण्यास समर्थ आहेत, अशी खूणगांठ मनाशीं बांधून ह्या भगीरथ प्रयत्नांत आपलें सर्वस्व पणास लावण्याचा

## सरदार वल्लभभाई पटेल आणि कॉँग्रेस

सरदार वल्लभभाईंनीं निश्चय केला. १९३० च्या कायदेभंगाच्या चळवळीनें अखिल हिंदुस्थानांत सगळीकडे देशभक्तीचा विद्युत्-संचार झाल्यासारखें दृश्य दिसून आलें. पण ह्या हिंदुस्थानव्यापी सविनय कायदेभंगाची पूर्वतयारी बारडोलीच्या करबंदीच्या आंदोलनानें आगाऊ करून ठेविली होती. गुजराथसारखा वैश्य वृत्तीनें भारलेला प्रान्त, करबंदी-सारखा पूर्वीं हिंदुस्थानांत कधींहि न झालेला संग्राम, इंग्रजांसारखे कुशल, पाताळयंत्री, साम्राज्यपिपासेनें धुंद झालेले परकीय राज्यकर्ते, आणि त्यांनीं निर्माण केलेली ब्रिटिश अंमलदारांची भक्कम पोलादी चौकट— अशा परिस्थितींत हा लढा वल्लभभाईंनीं लढविला. ह्या संग्रामामुळें वल्लभभाई ही किती थोर स्वार्थत्यागी, दृढ निश्चयी विरागी, व्यवहारदक्ष अशी महनीय विभूति आहे, हा रोमांचकारी चित्रपट हिंदुस्थानां-तील देशभक्तांच्या पुढें उभा राहिला. ह्या संग्रामांत राजकारणाचा कधींहि गंध न लागलेल्या शेंकडों स्त्रियांचें सैन्य सरदार वल्लभभाईंनीं उभें केलें. आणि त्यांच्याकडून शौर्यधैर्यादि सद्‌गुण जनतेस शिकविले. सरदार वल्लभभाईंचे पोवाडे खेडोंपाडीं गुजराथच्या स्त्रियांनीं गायिले. दांडीयात्रेच्या प्रचारानें जें अद्‌भुत परिवर्तन अखिल हिंदुस्थानांत घडून आलें, त्याचा पाया सरदार वल्लभभाईंच्या प्रखर संघटनेनें, प्रबल शिस्तीनें आणि देशभक्तीच्या तेजस्वी भावनेनें भरलेला होता. सरदार हे मितभाषी होते आणि विदग्ध वाङ्मयाची त्यांना अभिरुचि नव्हती; पण त्यांच्या प्रत्येक शब्दांत जें चैतन्य, जी जादू, जें तेज प्रत्येक महत्त्वाच्या प्रसंगीं निर्माण होई, विशिष्ट आणीबाणीच्या प्रसंगी जो अंतःकरणा-वर घणावर घातोडे मारल्यासारखा परिणाम त्यांच्या वक्तृत्वामुळें घडून येई, त्याचें कारण सरदारांची मनस्वी वीरवृत्ति, त्यांचा रणझुंझारपणा, त्यांची लोकविलक्षण निर्भयता, ह्या गुणांच्या मुशींतून त्यांचे शब्द उमटत होते, हें आहे.

### कठोर, कणखर वास्तववाद

सरदार वल्लभभाईंचा स्वभाव कठोर, वास्तववादी होता. पोकळ शब्दपांडित्य, पुस्तकी तत्त्वज्ञान, मनोहर कल्पनाविहार, सुरस काव्यालंकार, रंजक वाक्पाटव, अव्यवहार्य ध्येयविषयक मनोराज्यें, भावुकतेनें भारलेली स्निग्ध मृदुता आणि कृत्रिम सभ्यतेची ढोंगी चतुराई हे बुद्धीचे व भावनेचे प्रकार सरदार वल्लभभाई यांस केव्हांहि मानवले नाहींत. गेल्या अर्ध-शतकांत निर्माण झालेल्या कोणत्याहि ‘ इझम ’ नें त्यांच्या मनावर कांहींहि परिणाम झाला नाहीं. महात्मा-जींच्या प्रेरणेनें आणि त्यांच्या प्रत्यक्ष स्फूर्तिदायक उदाहरणानें इंग्रजांचें हिंदुस्थानांत स्थिर झालेलें राज्य कसें उलथून पाडतां येईल, एवढाच ध्यास सरदारांच्या मनास लागलेला होता. ह्या महान् कार्यांत आपली राखरांगोळी करून घेण्यांतच ह्या अतुल सेनानीस धन्यता, उत्साह व आनंद आयुष्य-भर वाटत राहिला. अहमदनगरच्या किल्ल्यांतच आपली चिरसमाधि स्थापिली जाईल अशी तयारी त्यांच्या मनानें करून ठेविली होती. आपल्या हयातीं-तच आपल्या शत्रूंवर आपली प्यादेमात होईल, अशा सुखमय स्वप्नानें त्यांनीं केव्हांहि आपलें मन विचलित होऊं दिलें नाहीं. इंग्रजांच्या लाघवी मुत्सद्देगिरीच्या शब्दजंजाळापासून अत्यंत धूर्ततेनें, सावधानपणानें, व्यवहारदक्षतेनें सरदार वल्लभभाई जन्मभर अलिप्त राहिले. त्यांच्या पोलादी कणखर-पणापासून रतिमात्रहि ते केव्हांहि ढळले नाहींत. लॉर्ड वेव्हेल यांच्यासारख्या मध्यश्रेणीच्या साम्राज्या-भिमानी व हुरूपी ब्रिटिश अंमलदारांच्या किंवा पेथिक-लॉरेन्सप्रभृति मुत्सद्द्यांच्या अंतरंगांतील मर्म अचूक हुडकून काढणाऱ्या खोल बुद्धीची देणगी सरदारांना अनेकविध अनुभवांनीं प्राप्त झालेली होती. आजकालच्या सुसंस्कृत राष्ट्रांतील कोणत्याहि सेनापतीची किंवा मुत्सद्द्यांची बरोबरी करण्यासारखे गुण सरदार वल्लभभाईंमध्यें एकवटलेले होते. असा दिग्विजयी नेता गेलीं पंचवीस वर्षें हिंदुस्थानास लाभला, हें हिंदुस्थानचें मोठें भाग्य होय. आणि म्हणूनच प्रत्येक देशभक्तास अशी उत्कट आशा वाटत होती कीं, जरी सरदारांचें शरीर जर्जर झालेलें असलें, तरी महात्माजींच्या पाठीमागें तरी निदान आणखी कांहीं वर्षें निसर्गानें सरदारांना आयुष्य द्यावें. त्यांच्या प्रयत्नानें कॉँग्रेससारख्या संस्थेमध्यें झुंजार वृत्ति निर्माण झाली होती.

### लढाऊ कॉँग्रेसचे निर्माते

कॉँग्रेसला जी थोरवी प्राप्त झालेली आहे, ती खान








श्री. हरि कृष्ण मोहनी

# सरदार वल्लभभाई पटेल आणि काँग्रेस

सरदार वल्लभभाईंच्या मृत्यूमुळें काँग्रेस ह्या हिंदुस्थानव्यापी प्रमुख राजकीय संस्थेची अपरिमित हानि झाली आहे. सरदारांचें शरीर अलीकडे अनेक आपत्तींनीं जर्जर झालेलें होतें, आणि हिंदी जनतेच्या सामान्य वयोमानाप्रमाणें पाहतां सरदार हे पिकलेलें पान झाले होते, हें खरें. तथापि, काँग्रेस ही संस्था ज्या कठिण, बिकट व आणीबाणीच्या संक्रमणावस्थेच्या काळांतून सांप्रत जात आहे, त्याकडे लक्ष देतां त्यांच्या असामान्य धुरीणत्वाची काँग्रेसला आज अत्यंत गरज होती ह्यांत कांहीं शंका नाहीं. ज्या थोड्या असाधारण सामर्थ्यसंपन्न नेत्यांनीं काँग्रेसचा लौकिक हिंदुस्थानांतच केवळ नव्हे तर अखिल जगांत पसरविला, त्यांत वल्लभभाई हे अग्रेसर होते, हें कोणासहि कबूल करणें प्राप्त आहे.

महात्मा गांधींनीं गेल्या तीस वर्षांत जागतिक राजकीय इतिहासाचा परंपरागत ओघ बदलविणाऱ्या ज्या सत्याग्रहाच्या अभूतपूर्व आंदोलनाचें अभिमंत्रण केलें, त्या महान् कार्यांत महात्मा गांधीजींचे सरदार वल्लभभाई हे उजवे हात ठरावेत, इतकें प्रभावी साहाय्य या आंदोलनांत सरदारांनीं गांधीजींस केलें आहे. महात्मा गांधीजींच्या सत्याग्रही चळवळींत धार्मिक, सामाजिक, आर्थिक, शैक्षणिक व राजकीय असा सर्व प्रकारचा क्रांतिकारक कार्यक्रम सामावलेला असला, तरी त्या कार्यक्रमाचा केंद्रबिंदु हिंदुस्थानचें राजकीय स्वातंत्र्य हाच होता. आणि म्हणूनच हिंदुस्थानचें आसेतुहिमाचल असें जानपद समुत्थान त्यांना घडवून आणणें शक्य झालें. कारण राजकीय स्वातंत्र्य ही हिंदुस्थानची मुख्य गरज होती, हें आबालवृद्धांस प्रतीत होऊन चुकलें होतें.

## कृष्णार्जुनाची जोडी

सरदार वल्लभभाईंचा मूळचा स्वाभाविक पिंड क्षत्रिय मनोवृत्तीचा, ' शौर्यं तेजो धृतिर्दाक्ष्यं युद्धे चाप्यपलायनम् । दानमीश्वरभावश्च ' ह्या गुणांचा आविष्कार करणारा असा होता. महात्मा गांधींच्या ' शमो दमस्तपः शौचं क्षांतिरार्जवं ' ह्या ब्राह्मगुणांपेक्षां, महात्माजींची शौर्यशाली अशी सत्याग्रही वृत्ति, त्यांचा सविनय कायदेभंग, त्यांचें असामान्य असें युद्धतंत्र, अत्यंत बलाढ्य व राक्षसी शत्रुसेनेवर एकट्यानें चालून जाणारें महात्माजींचें भयंकर धाडसी तेज ह्याच गुणांनीं सरदारांचें युयुत्सु मन उत्स्फूर्त होणें अगदीं स्वाभाविक होतें. गुजराथच्या भूमीचें हे दोन असामान्य वीरपुत्र हिंदुस्थानच्या भाग्यानें एकत्र येऊं शकले; कृष्णार्जुनाप्रमाणें त्यांचा हिंदुस्थानाच्या उद्धारासाठीं एकजीव झाला. आणि म्हणूनच हिंदुस्थानाच्या ह्या दिव्य अहिंसायुक्त भारतीय युद्धामुळें सर्व जगाचें लक्ष हिंदुस्थानानें वेधून घेतलें.

खेडा, चंपारण्य येथील महात्माजींची रणनीति सरदार वल्लभभाईंनीं चिकित्सक बुद्धीनें अवलोकन केली होती. असहकाराचें महात्माजींनीं केलेलें हिंदुस्थानव्यापी आंदोलन सरदार वल्लभभाईंच्या शौर्यशाली मनांत खोल रुजलेलें होतें. महात्माजी हेच एकमेव आद्वितीय पुढारी हिंदुस्थानाचा उद्धार करण्यास समर्थ आहेत, अशी खूणगांठ मनाशीं बांधून ह्या भगीरथ प्रयत्नांत आपलें सर्वस्व पणास लावण्याचा

सरदार वल्लभभाईंनीं निश्चय केला. १९३० च्या कायदेभंगाच्या चळवळीनें अखिल हिंदुस्थानांत सगळीकडे देशभक्तीचा विद्युत्-संचार झाल्यासारखें दृश्य दिसून आलें. पण ह्या हिंदुस्थानव्यापी सविनय कायदेभंगाची पूर्वतयारी बारडोलीच्या करबंदीच्या आंदोलनानें आगाऊ करून ठेविली होती. गुजराथसारखा वैश्य वृत्तीनें भारलेला प्रान्त, करबंदी-सारखा पूर्वीं हिंदुस्थानांत कधींहि न झालेला संग्राम, इंग्रजांसारखे कुशल, पाताळयंत्री, साम्राज्यपिपासेनें धुंद झालेले परकीय राज्यकर्ते, आणि त्यांनीं निर्माण केलेली ब्रिटिश अंमलदारांची भक्कम पोलादी चौकट— अशा परिस्थितींत हा लढा वल्लभभाईंनीं लढविला. ह्या संग्रामामुळें वल्लभभाई ही किती थोर स्वार्थत्यागी, दृढ निश्चयी विरागी, व्यवहारदक्ष अशी महनीय विभूति आहे, हा रोमांचकारी चित्रपट हिंदुस्थानां-तील देशभक्तांच्या पुढें उभा राहिला. ह्या संग्रामांत राजकारणाचा कधींहि गंध न लागलेल्या शेंकडों स्त्रियांचें सैन्य सरदार वल्लभभाईंनीं उभें केलें. आणि त्यांच्याकडून शौर्यधैर्यादि सद्गुण जनतेस शिकविले. सरदार वल्लभभाईंचे पोवाडे खेडोंपाडीं गुजराथच्या स्त्रियांनीं गायिले. दांडीयात्रेच्या प्रचारानें जें अद्भुत परिवर्तन अखिल हिंदुस्थानांत घडून आलें, त्याचा पाया सरदार वल्लभभाईंच्या प्रखर संघटनेनें, प्रबल शिस्तीनें आणि देशभक्तीच्या तेजस्वी भावनेनें भरलेला होता. सरदार हे मितभाषी होते आणि विदग्ध वाङ्मयाची त्यांना अभिरुचि नव्हती; पण त्यांच्या प्रत्येक शब्दांत जें चैतन्य, जी जादू, जें तेज प्रत्येक महत्त्वाच्या प्रसंगीं निर्माण होई, विशिष्ट आणीबाणीच्या प्रसंगी जो अंतःकरणा-वर घणावर हातोडे मारल्यासारखा परिणाम त्यांच्या वक्तृत्वामुळें घडून येई, त्याचें कारण सरदारांची मनस्वी वीरवृत्ति, त्यांचा रणझुंझारपणा, त्यांची लोकविलक्षण निर्भयता, ह्या गुणांच्या मुशींतून त्यांचे शब्द उमटत होते, हें आहे.

### कठोर, कणखर वास्तववाद

सरदार वल्लभभाईंचा स्वभाव कठोर, वास्तववादी होता. पोकळ शब्दपांडित्य, पुस्तकी तत्त्वज्ञान, मनोहर कल्पनाविहार, सुरस काव्यालंकार, रंजक वाक्पाटव, अव्यवहार्य ध्येयविषयक मनोराज्यें, भावुकतेनें भारलेली स्निग्ध मृदुता आणि कृत्रिम सभ्यतेची ढोंगी चतुराई हे बुद्धीचे व भावनेचे प्रकार सरदार वल्लभभाई यांस केव्हांहि मानवले नाहींत. गेल्या अर्ध-शतकांत निर्माण झालेल्या कोणत्याहि ' इझम ' नें त्यांच्या मनावर कांहींहि परिणाम झाला नाहीं. महात्मा-जींच्या प्रेरणेनें आणि त्यांच्या प्रत्यक्ष स्फूर्तिदायक उदाहरणानें इंग्रजांचें हिंदुस्थानांत स्थिर झालेलें राज्य कसें उलथून पाडतां येईल, एवढाच ध्यास सरदारांच्या मनास लागलेला होता. ह्या महान् कार्यांत आपली राखरांगोळी करून घेण्यांतच ह्या अतुल सेनानीस धन्यता, उत्साह व आनंद आयुष्य-भर वाटत राहिला. अहमदनगरच्या किल्ल्यांतच आपली चिरसमाधि स्थापिली जाईल अशी तयारी त्यांच्या मनानें करून ठेविली होती. आपल्या हयातीं-तच आपल्या शत्रूंवर आपली प्यादेमात होईल, अशा सुखमय स्वप्नानें त्यांनीं केव्हांहि आपलें मन विचलित होऊं दिलें नाहीं. इंग्रजांच्या लाघवी मुत्सद्देगिरीच्या शब्दजंजाळापासून अत्यंत धूर्ततेनें, सावधानपणानें, व्यवहारदक्षतेनें सरदार वल्लभभाई जन्मभर अलिप्त राहिले. त्यांच्या पोलादी कणखर-पणापासून रतिमात्रहि ते केव्हांहि ढळले नाहींत. लॉर्ड वेव्हेल यांच्यासारख्या मध्यश्रेणीच्या साम्राज्या-भिमानी व हुरूपी ब्रिटिश अंमलदारांच्या किंवा पेथिक-लॉरेन्सप्रभृति मुत्सद्द्यांच्या अंतरंगांतील मर्म अचूक हुडकून काढणाऱ्या खोल बुद्धीची देणगी सरदारांना अनेकविध अनुभवांनीं प्राप्त झालेली होती. आजकालच्या सुसंस्कृत राष्ट्रांतील कोणत्याहि सेनापतीची किंवा मुत्सद्द्यांची बरोबरी करण्यासारखे गुण सरदार वल्लभभाईंमध्यें एकवटलेले होते. असा दिग्विजयी नेता गेलीं पंचवीस वर्षें हिंदुस्थानास लाभला, हें हिंदुस्थानचें मोठें भाग्य होय. आणि म्हणूनच प्रत्येक देशभक्तास अशी उत्कट आशा वाटत होती कीं, जरी सरदारांचें शरीर जर्जर झालेलें असलें, तरी महात्माजींच्या पाठीमागें तरी निदान आणखी कांहीं वर्षें निसर्गानें सरदारांना आयुष्य द्यावें. त्यांच्या प्रयत्नानें कॉंग्रेससारख्या संस्थेमध्यें झुंजार वृत्ति निर्माण झाली होती.

### लढाऊ कॉंग्रेसचे निर्माते

कॉंग्रेसला जी थोरवी प्राप्त झालेली आहे, ती खास



अनुक्रमणिका





अब्दुल गफारखान, पंडित जवाहिरलालजी यांच्या-सारख्या सरदारांच्या खांद्यास खांदा लावून लढणाऱ्या थोड्या सेनापतींमुळेंच केवळ आहे. ह्या थोड्या सेनापतींनीं काँग्रेसचें एक खडें, स्वयंसेवकांचें सैन्य गेल्या तीस वर्षांत उभें केलें; आणि ब्रिटिश साम्राज्य-शाहीशीं चुरशीचा सामना दिला. इतक्या मोठ्या स्वयंसेवकांच्या सैन्यास जागतिक राजकीय इतिहासांत तोड सांपडेल, असें वाटत नाहीं. हे अद्वितीय सेनानी लढाऊ काँग्रेसचे निर्माते म्हटले पाहिजेत. काँग्रेस संस्थेनें ह्या सेनानींना निर्माण केलेलें नाहीं. सरदार वल्लभभाईसारख्या नेत्यांनीं महात्माजींनीं आभिमंत्रित केलेल्या सत्याग्रही शस्त्राचें शिक्षण घेऊन तें आधिक परिणामकारक करण्यासाठीं काँग्रेसला साधनभूत बनविलें. काँग्रेस-संघटनेमधील प्रत्येक सैनिकाच्या अंतःकरणांत सत्याग्रही शस्त्राच्या मागची तत्त्वप्रणाली जाणून त्याची मीमांसा करण्याची, सत्याग्रहाचें रहस्य समजण्याची कुवत निर्माण झाली नाहीं. ह्या थोड्या लढाऊ सेना-पतींच्या हातांत खेळणारें एक जड यंत्र, युद्धतंत्रांतील केवळ एक प्रभावी अचेतन असें तंत्र किंवा साधन असें काँग्रेसचें स्वरूप राहिलें. स्वराज्यप्राप्तीपूर्वीच्या काँग्रेस-संघटनेचा वास्तविक अर्थ असा आहे. सरदार वल्लभभाईसारख्या लढाऊ वृत्तीच्या सेनापतीच्या कर्तृत्वामुळें काँग्रेस संघटनेची इभ्रत वाढली खरी; पण त्यामुळें काँग्रेस संघटनेमध्यें व्यक्तिनिष्ठतेचेंच प्राबल्य माजलेलें आहे. लोकसत्तानिष्ठ अशा संघटनेचें सामर्थ्य, आत्मविश्वास व ज्ञान काँग्रेसच्या प्रत्येक सभासदामध्यें निर्माण होण्याचें तर बाजूसच राहिलें, पण पुरेशा अल्पसंख्य सभासदांमध्यें देखील तें ज्ञान, तो आत्मविश्वास व तें सामर्थ्य निर्माण झालेलें नाहीं !

सरदार वल्लभभाईंच्या व्यक्तित्वाभोंवतालचें तेजोवलय काँग्रेस-संघटनेनें विस्तृत केलें होतें. आणि म्हणून त्या तेजोवलयाचा प्रभाव लहानमोठ्या संस्थानिकांवर पडून देशी संस्थानांचा बिकट प्रश्न स्वराज्यप्राप्तीनंतर सरदार वल्लभभाईंना सौकर्यानें सोडवितां आला; आणि भारतांत एकछत्री लोक-शाहीचें स्वराज्य प्रस्थापित होऊन भारतीय इति-हासांत अपूर्व अशी सार्वभौम जनसत्ता निर्माण झाली. सरदार वल्लभभाईंच्या असाधारण अशा लढाऊ वृत्तीचेंच हें अखरेचें पर्यवसान होतें, असेंच ह्या संस्थानिकांच्या बाबतींतील सरदारांच्या अविस्मरणीय कर्तृत्वासंबंधीं म्हणतां येण्यासारखें आहे.

### स्वातंत्र्योत्तर काँग्रेसमधील मतभेद

काँग्रेसची हिंदुस्थानव्यापी संघटना, सरदार वल्लभ-भाई व काँग्रेसचे इतर लढाऊ वृत्तीचे त्यांचे साथीदार सेनापति यांनीं निर्माण केलेलें सत्याग्रही सामर्थ्य, ह्यांचें कार्य राजकीय स्वराज्यप्राप्तींतच परिसीमित झालेलें आहे. स्वराज्यप्राप्तीनंतर राजकारण कर-णारी काँग्रेस संघटना एक तर विलीन व्हावी, अथवा, राज्यसंस्थेस प्रमुखपणानें मदत करणारें असें तिचें स्वरूप बनावें, काँग्रेसचें एका प्रबल राजकीय पक्षांत रूपांतर करून पार्लमेंटमधून चालणाऱ्या अनेक-विध कार्यांतच प्रामुख्यानें ती काँग्रेस-संस्था अंतर्धान पावावी, हें सरदार वल्लभभाईंचें राजकीय धोरण असावें, असें अलीकडे दिसून येत होतें. आणि ह्याच मुद्द्यावर सरदार वल्लभभाई व विधायक कार्याला वाहिलेले असे गांधीजींचे कांहीं खास अनुयायी ह्यांचा मतभेद होऊं लागला होता. सत्याग्रही सामर्थ्य राष्ट्रांत वाढीस लागलें पाहिजे. ' गांधीजींची सत्या-ग्रही परंपरा त्यांच्या देहावसानानंतर टिकवून ठेवणें सद्यःपरिस्थितींत अधिकच जरूरीचे आहे ', असें प्रामाणिकपणानें मानणारा एक अत्यंत लहानसा गट हिंदुस्थानांत शिल्लक आहे. पार्लमेंटरी कार्य उत्तरोत्तर अधिकाधिक यशस्वी करण्याच्या प्रयत्नांतच हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याचें पुढील यश आणि स्वराज्य-ची स्थिरता अवलंबून आहे असा विश्वास बाळगणारा पक्ष, गट किंवा असे नेते आजच्या काँग्रेस-संघटनेमध्यें प्रभावी आहेत. ' राज्यसंस्थेच्या, राज्याधिकारातर्फे प्राप्त होणाऱ्या, सामर्थ्यावर विसंबून राहून लोकहित अधिक लवकर साध्य करून घेतां येईल; स्वराज्याच्या सुखसोयी गरीबांच्या झोंपड्यांपर्यंत राज्यसंस्थेच्या द्वारांच पोंचविणें सद्यःस्थितींत अधिक व्यवहार्य आहे; म्हणून पार्लमेंटरी कार्यक्रमावरच काँग्रेसची शक्ति सांप्रत केंद्रित झाली पाहिजे ', असें काँग्रेस-मधील बहुसंख्य पुढाऱ्यांस उत्कटपणानें वाटत आहे. उलट पक्षीं, ' गांधीजींनीं निर्माण केलेलें सत्याग्रही सामर्थ्य जनतेंत उत्पन्न केल्याशिवाय सद्यःस्थितींत











मुळींच तरणोपाय नाहीं; असें सामर्थ्य जनतेमध्यें निर्माण झालें नाहीं तर राज्यसंस्थेची, निवडणुकाद्वारें अधिकारपदारूढ अनेकविधं सत्ताधारी व त्यांच्या दिमतींत राहणारा बडा अंमलदारवर्ग ह्यांची हळूं-हळूं किंवा झपाट्यानें अवनतीच होत राहणार; सत्याग्रही सामर्थ्याशिवाय राज्यसंस्था ही देश-हितास पूरकहि बनूं शकणार नाहीं ', असें गांधीजीं-च्या कांहीं थोड्या खऱ्या अनुयायांचें सद्यःस्थितीचें प्रांजल व नम्र निदान आहे.

## राष्ट्रांतील निराशा वाढविणारा भयंकर अपघात

सत्याग्रही सामर्थ्य निर्माण करण्याची आकांक्षा हा सद्यःस्थितींत अव्यवहार्य ठरणारा ध्येयवाद आहे, गांधीजींचें सत्याग्रही सामर्थ्य जिवंत, जागृत व संतत ठेवण्याचा प्रयत्न हा गांधीजींच्या श्रद्धायुक्त, परंपरा-निष्ठ, कर्मठ अनुयायांचा अंध विश्वास आहे, असें मनापासून वाटणाऱ्या पुढाऱ्यांचेंच काँग्रेसमध्यें सांप्रत प्राधान्य आहे. काँग्रेसमधील सध्यां अधिकारपदावर आरूढ असलेल्या पुढाऱ्यांत सरदार वल्लभभाईइतके नेकीचे, स्वार्थत्यागी, बेलभंडार उचलून जिवाचें मोल पणाला लावून देशकार्य करणारे अतुल परा-क्रमी असे दुसरे पुढारी क्वचितच आहेत. ह्या आणीबाणीच्या प्रसंगीं घडून आलेल्या सरदारांच्या मृत्यूमुळें, सत्तारूढ राहून देशकार्य साधण्याची ईर्षा बाळगणाऱ्या ह्या थोड्या पुढाऱ्यांस निराशा वाटेल, अशी परिस्थिति निर्माण झाली आहे. कारण सत्या-ग्रह प्रत्यक्ष जन्मभर आचरून दाखविणारे सरदार वल्लभभाईइतके कर्तबगार पुढारी काँग्रेससंघटनेंत विरळाच असल्यामुळें, सत्तेच्या तर्फे जनहित साध्य करण्याच्या विचारसरणीस, वल्लभभाई हयात नसतांना, देशप्रेमापेक्षां स्वार्थीपणाचा, महत्त्वाकांक्षेचा, ढोंगी वृत्तीचाच वास प्रत्येकास आल्याशिवाय राहणार नाहीं, अशी दारुण परिस्थिति सरदारांच्या मृत्यूमुळें निर्माण झाली आहे. ह्या परिस्थितीच्या उलट, वल्लभभाईसारख्यांच्या प्रामाणिक मतभेदांमुळें विधायक कार्याच्या द्वारें सत्याग्रही वृत्तीची जोपासना करणाऱ्या, सत्याग्रह ही साधना समजून तिची आराधना करूं पाहणाऱ्या, सत्तेच्या बाहेर राहून कार्य करण्यास सज्ज असलेल्या सत्याग्रही लोक-सेवकांस जो जोश, आवेश व अभिनिवेश स्वतःमध्यें आणून घेणें आवश्यक वाटत होतें, त्यांत देखील वल्लभभाईंच्या मृत्यूमुळें ढिलाई निर्माण होण्याचा संभव प्राप्त झाला आहे. वल्लभभाईंचा मृत्यु हा जसा प्रामाणिक व स्वार्थत्यागी काँग्रेस सत्ताधाऱ्यांना नाउमेद करणारा आहे, त्याचप्रमाणें हिरीरीनें सत्याग्रहाची कांस धरणाऱ्या जनसेवकांमध्यें शैथिल्य निर्माण करण्यास तो सहायभूत होऊं शकेल, असेंहि दिसत आहे. प्रामाणिक, जनहितदक्ष अशा थोड्या राज्यसंस्थान्तर्गत सत्ताधाऱ्यांच्या दृष्टीनें अवलोकन केलें, किंवा विधायक कार्य करणाऱ्या युयुत्सु लोकसेवकांशीं, सत्याग्रही उपासकांशीं समरस होऊन विचार केला, तरी देखील दोन्हीं पक्षीं, सरदारांचा मृत्यु हा एक प्रकारचा राष्ट्रांतील निराशा वाढविणारा अपघातच ठरेल, अशी भीति आहे. हिंदुस्थानच्या सुदैवानें काँग्रेस-संस्थेबद्दल आपुलकीनें विचार करणाऱ्या काँग्रेस-सत्ताधाऱ्यांनीं सरदारांच्या मृत्यूनें आणि त्यांच्या ज्वलंत उदात्त उदाहरणानें देशप्रेमाची, स्वार्थ-त्यागाची नवीन स्फूर्ति घेतली आणि विधायक कार्यकर्त्यांनीं नवीन जबाबदारीची जाणीव ठेवून सरदारांच्या चितेंतून सत्याग्रही वृत्तीची दीप्तिमान् रक्षा कपाळीं लावून जोमानें कार्य करण्याचें मनांत आणलें तर ' The King is dead; long live the King ' ह्या वाक्यांत दिग्दर्शित झालेल्या तत्त्वाप्रमाणें सरदारांच्या मृत्यूंतून नवीन सरदार जिवंत झालेले दिसून येतील.

---



अनुक्रमणिका






# सारसंकलन

## कडवी धर्मान्धता व त्याविरुद्ध इलाज

या वर्षाचें नुकतेंच ज्यांना नोबेल प्राइझ मिळालें आहे त्या बर्ट्रान्ड रसेल यांनीं " वर्ल्ड रिव्ह्यू" च्या ऑगस्टच्या अंकांत " Fanatics "– ' कडवे धर्मान्ध ' – या विषयीं एक लेख लिहिला आहे. त्या नियतकालिकाचे संपादक म्हणतात त्याप्रमाणें हा लेख त्यांच्या " हिस्टरी ऑफ वेस्टर्न फिलॉसफी" या ग्रंथांतील एक विषय आहे. त्यांचें म्हणणें असें आहे कीं, प्रदीर्घ कालखंडांत ज्या गोष्टींविषयीं विवाद चालू असतो त्या गोष्टींबद्दल उभयपक्षांत कांहीं बाबतींत सत्य असतें व कांहीं बाबतींत प्रमाद असतो. रसेलची ही बुद्धिवादी दृष्टि आपण समजून घेणें अवश्य आहे. पुढील उताऱ्यांत रसेलनीं कडव्या धर्मान्धतेला प्रतिबंधक होणारे जे उपाय सुचविले आहेत ते थोडक्यांत दिलेले आहेत :

" धर्मनिष्ठेंतील भेदांमुळें लढायाच माजल्या पाहिजेत असें नाहीं; जेव्हां धर्मान्ध असहिष्णुता त्यांत शिरते तेव्हांच रक्तपात होतात. चीन व जपानमध्यें बौद्धधर्माचा प्रचार शान्तपणें झाला. केवळ एकच धर्म खरा असला पाहिजे असा हट्टाग्रह चिनी किंवा जपानी लोकांनीं धरला नाहीं. चीनमध्यें बुद्धांचा व कुन्फुत्सेचा (कन्फ्यूशियसचा) हे दोन्हीहि धर्म टिकले; जपानांत बौद्धधर्म व शिन्टो धर्म राहिले. ग्रीक-रोमन कालांत असेंच उदारवादी मत साधारणपणें होतें. मिसरचे व बाबिलोनचे देव रोममध्यें पूजिले जात होते. ' मिथ ' देवाची भक्ति पसरूं दिली जात होती आणि परदेशी देवांची पूजा करणाऱ्या लोकांनीं केवळ त्या कारणामुळें कांहीं स्वतः-च्या देशांतील दैवतांची भक्तिहि सोडली नाहीं.

" मध्ययुगांत मात्र सर्वत्र लढाईच्या जोरावर धर्मतत्त्वांचा प्रसार करण्यांत आला. बाप्तिस्मा न घेणाऱ्या लोकांची शार्लेमेन बादशाहानें कत्तल केली व अशा तऱ्हेनें सॅक्सन लोकांना धर्मान्तर करावयास भाग पाडलें. सेंट जॉनचे हस्तक आणि सरदार मुस्लिमांबरोबर लढले. तिसरें क्रुसेड हें ' धर्मार्थ ' युद्ध ग्रीक–ऑर्थाडॉक्स–चर्चविरुद्ध पुकारलें गेलें. सायमन द-मॉन्टफर्डनें आल्बिनेन्शियन धर्मविरोधकांना बहिष्कृत केलें. पांचव्या हेन्रीनें व कॉन्स्टन्सच्या कौन्सिलनें विक्लिफच्या अनुयायांना जाळलें. स्पेनमध्यें ज्यू व मूर लोकांचा प्रथम छळ झाला व मग त्यांना हद्दपार करण्यांत आलें. बाल्कन राष्ट्रांत बोगोमिलचा धर्मविरोध समूळ उखडला गेला.

" सोळाव्या आणि सतराव्या शतकांत जीं धर्मासाठीं युद्धें झालीं त्यांच्या मानानें वरील लढाया कांहींच नव्हत. पण १९१४ नंतरच्या आधुनिक काळांत हा कडवेपणा एकंदरींत वाढतच आहे. सामान्यतः त्यापासून मुक्त असणाऱ्या यापूर्वीच्या काळांतहि तो नव्हताच असें नाहीं. पण त्यापुढचा कडवेपणा अधिक स्पष्ट दिसतो—पहिल्या महायुद्धाच्या वेळचा व नंतरचा जर्मनविरोध, त्यानंतरचा, त्याला उत्तरादाखल आलेला, नात्सीवाद आणि ज्यूविरोध; त्याला प्रतिस्पर्धी म्हणून उत्पन्न झालेला ज्यूंचा ' झिऑनिझम् '–Zionism; आणि सर्वांत महत्त्वाचा म्हणजे साम्यवादी व साम्यवाद-विरोधी धर्मान्ध कडवेपणा होय....

" आणि कडवेपणा सरकारी स्वामित्वाखालीं वावरणारा असला तर इतरांबरोबर सहकार्य साधणें तो अशक्यच करून टाकतो. नात्सी व कम्युनिस्ट सरकारांनीं तह आणि करार ह्या गोष्टी निरुपयोगी करून टाकल्या आहेत, कारण त्यांच्या धर्मांधतेमुळें त्यांना परस्परविश्वास वाटणें अशक्यच होऊन गेलें आहे. कम्यूनिझममधील कडवेपणा कमी व्हावा आणि अमेरिकेचा विरोधी कडवेपणा परस्पर-








सहकार्याला विरोध करण्याएवढा वाढूं नये; असें आपण इच्छावें.

"या धर्मान्ध कडवेपणावर इलाज म्हणून तीन गोष्टी करणें आवश्यक आहे : ( १ ) सुरक्षिततेची खात्री, ( २ ) समृद्धता आणि ( ३ ) उदारमतवादी शिक्षण. सुरक्षिततेची खात्री नसल्यामुळें कडवेपणा वाढून युद्धाला अनुकूलता उत्पन्न होते. हायड्रोजन-बॉम्ब आणि विषारी जंतुमय अस्त्रें यांच्या भीतीमुळें राष्ट्रें अधिकाधिक कडवीं बनतात. आजच्या राजकीय वातावरणांत या भीतीचा निरास करण्याची गोष्ट फार कठिण आहे. पण सर्वनाश टाळावयाचा असेल तर हें करावयास पाहिजेच. समृद्धि पाहिजे, तरच साम्यवादी विचार प्रसार पावणार नाहींत, हें पश्चिमेकडील लोकांना पटतें; पण रशियाहि समृद्ध झाल्यास तें उपकारकच होईल, हें मात्र त्यांना पटत नाहीं. रशियाच्या वागण्याच्या पद्धतीमुळें त्याच्याशीं व्यापार-व्यवहार चालूं करणें कठिण जात आहे, हें खरें. पण त्यांचा संशय दूर होणें कालान्तरानेंच शक्य आहे. उदारमतवादी शिक्षण देण्याची गोष्ट तर सर्वांत कठिण होऊन बसली आहे. रशियांत तें अशक्य आहे आणि अमेरिकेंतहि तें प्रतिवर्षीं कमी होत आहे. डॉ. लॅटिमोरची गोष्ट लक्षांत घ्या. सर्व जाणत्या माणसांना माहीत असलेल्या चीनविषयक कित्येक खऱ्या गोष्टी उघडपणें बोलल्याबद्दल त्यांना द्रोही म्हणून मानण्यांत आलें; आणि खरोखर त्या गोष्टी समजणें हें अमेरिकेच्या दृष्टीनें अगत्याचें होतें. ही शैक्षणिक सुधारणाहि सुरक्षिततेच्या खात्रीवरच अवलंबून आहे.

"मग हें साधावें कसें ? आपण ज्या गोष्टींवर भर देतों त्यांत बदल झाला पाहिजे–There must be a change of emphasis : आपण हें दाखविणें उपयुक्त आहे कीं, युद्ध हें कोणालाहि केव्हांहि अनिष्टच असतें. फक्त आपल्यालाच विजय मिळणार व तो तसा मिळणें इष्टच आहे, हें जगाला दाखवीत बसणें आपण सोडून दिलें पाहिजे. चर्चेचें स्वातंत्र्य असलेल्या आपल्या देशांत बुद्धिवादी लोकांनीं, विशेषतः शास्त्रज्ञांनीं, एकत्र येऊन हें स्पष्ट केलें पाहिजे कीं, ( १ ) यापुढें युद्ध झालेंच तर तें जित पक्षाप्रमाणेंच जेत्यालाहि अनर्थकारक होईल; ( २ ) दोन भिन्न प्रणालींचीं राज्यें ( अमेरिका व रशिया ) शांतपणें वागूंच नयेत, याला काहींहि कारण नाहीं; ( ३ ) जगाचे विभाग पाडून त्यावर एकेका विचारप्रणालीच्या राज्याचें स्वामित्व चालून त्यानें अन्य विभागांत ढवळाढवळ न करणें अगदीं शक्य आहे. विशेषतः हें सांगितलें पाहिजे कीं, हें शक्य करून दाखवितां न आल्यास सर्वनाश ठरलेला आहे– व तो केवळ एका पक्षाचा किंवा समूहाचा नव्हे तर, सर्व मानवजातीचाच विनाश ठरणार.

"जगांत शांतता नांदावयाची असेल तर जागतिक सरकाराची स्थापना हें आपलें उद्दिष्ट असलें पाहिजे. ही गोष्ट अत्यंत कठिण आहे आणि पांच-पन्नास वर्षांच्या आंत घडून येणें अशक्य आहे. पण मध्यंतरीच्या काळांत शांतता टिकविणें अत्यावश्यक आहे. आपल्या दैवांत काय लिहिलें आहे, याची जाणीव सतत ठेवली पाहिजे; आर्थिक बाबतींत सुजाण व्यवहार शिकला पाहिजे. सर्व भिन्न वंशांनीं एकमेकांना बरोबरीच्या नात्यानें वागविलें पाहिजे; आणि भिन्न तात्त्विक मतप्रणालींच्या बाबतींत सहिष्णुता अंगीं बाणविली पाहिजे. जर भयंकर युद्ध टाळतां आलें तर माणसाच्या नैसर्गिक शुभवृत्तींमुळें या गोष्टी घडून येतील. आणि सरतेशेवटीं स्थिर जागतिक राज्यसत्ता आपण निर्माण करूं शकलों तर, आपणाला इतिहासांतलि एक अपूर्व समृद्धीचा आणि कल्याणाचा कालखंड पहावयास मिळेल."

### उटकमंडची वनस्पतिसंग्राहक बाग

उटकमंडचें वनस्पति-उद्यान "पूर्वेकडील रत्न" Ornament of the East—म्हटलें जातें. गेल्या मे महिन्यांत या उद्यानाचा शतसांवत्सरिक दिन साजरा झाला. हिंदुस्थानांतील जनतेनें आणि सरकारनें आतां अशा संग्रहस्थानांकडे अधिकाधिक लक्ष पुरविलें पाहिजे. मद्रास-सरकारनें या सरकारी बगीचाची मदत या वर्षी रु. ३९,००० एवढी कमी केली हें जरी काटकसरीच्या दृष्टीनें सयुक्तिक असलें तरी वनस्पतिशास्त्रीय संशोधनाची हिंदुस्तानसारख्या शेतकीप्रधान देशाला किती आवश्यकता आहे हें पहातां यापुढें भारतांतील केंन्द्रीय व प्रांतीय सरकारांनीं अशा संशोधनसंस्थांच्या मदतींत








कपात करण्याचें धोरण कठोरपणें अंमलांत आणूं नये, हें उचित वाटतें.

या रत्नभूत बगीचाची माहिती "मॉडर्न रिव्ह्यू" च्या सप्टेंबरच्या अंकांत डॉ. नीरा श्रीनिवासन् M. Sc., Ph. D., यांनीं एका लेखांत करून दिली आहे. ती संक्षेपानें पाहण्यासारखी आहे :

"सन १८४९ मध्यें उटीच्या कांहीं युरोपियन रहिवाश्यांनीं जमून असें ठरविलें कीं, येथें इंग्लिश भाजीपाला, वनस्पति यांची लागवड करावयाची. दोन वर्षांनीं नीलगिरि प्रदेशांतील पहिल्या कमिशनर साहेबांनीं वर्गणी जमवून 'नीलगिरि पर्वतांतील शेती व बागायती संस्था' स्थापन केली. अशा तऱ्हेनें झालेली ही सुरुवात मोठी स्पृहणीय ठरली आहे. मूळचा हेतु असा होता कीं, त्या बगीच्या-मुळें इंग्लिश फळें-फुलें व भाज्या यांचा पुरवठा सारखा होत रहावा, जवळपासच्या राष्ट्रांतील वनस्पतींचा संग्रह करावयाला ठिकाण मिळावें, मद्रास इलाख्यांतील बागायती केन्द्रांना उत्कृष्ट बियाणें उपलब्ध व्हावें आणि ग्रेट ब्रिटन व हिंदुस्थान यांमधील शास्त्रज्ञांना एकमेकांच्या देशांतील ववस्पतींची अंतर्गत देवाण-घेवाण करणें सुलभ व्हावें. त्यानंतर अनेक मुख्याधिपतीं-(क्यूरेटर्स) च्या देखरेखीखालीं ही बाग भरभराटत जाऊन आज ती हिंदुस्थानाला ललामभूत झाली आहे.

"वनस्पतींच्या जगांतील जो जो नमुना संग्रहीत करणें आवश्यक आहे त्याचा त्याचा केलेला संग्रह येथील बगीच्यावांचून अन्यत्र क्वचितच पाहा-वयास मिळेल. सायबेरिया ते न्यू झीलंड, व जपान ते ब्राझील अशा तीस देशांतील निरनिराळ्या तऱ्हांच्या जवळ जवळ १००० वनस्पती येथें आहेत. परदेशीय वनस्पतींना प्रतिकूल जमिनींत लागवडीला आणणें हें किती श्रमाचें काम आहे, याची कल्पना करून पहावी. या वनस्पतींत ३५ जातींचीं यूकॅलिप्टस-चीं झाडें आहेत, ७५ जातींचे गुलाब आहेत आणि पाइन, कॉनिफर व इतर अनेक तऱ्हांचे वृक्ष आहेत. यांतील हिरवळीची योजना खरोखरच लक्षांत राहण्यासारखी असून तेथील सर्व वातावरणांत तोल आणि शांतता आढळून येते. उष्णकटि-बंधापासून समशीतोष्ण कटिबंधापर्यंत सर्व प्रदेशांतील वनस्पतींची वाढ करण्यासाठीं येथें संवर्धनालयें (Nurseries) आणि कांचघरें आहेत. केवळ शोभेची वस्तु म्हणूनच नव्हे तर नीलगिरींचें औद्योगिक वैभव वाढविण्यांतहि या बागेचा मोठा हिस्सा आहे.

"या बगीचाची वाढ कल्पकता, धीर आणि मेहनत यांमुळें खूपच झाली. कोयनेलचें झाड जें सिंकोना त्याच्या लागवडीचें उदाहरण लक्षांत ठेवण्यासारखें आहे. या मूळ पश्चिम-गोलार्धांतील जंगली वनस्पतीची येथें लागवड करण्याचें काम पहिल्या क्युरेटरनीं केलें. त्यानंतर जावा बेटांतील डच सरकारशीं देवघेव करून याच्या नवीन जाती येथें आणल्या आणि त्यांची लागवड नीलगिरी-प्रमाणच सिकिम व सीलोन येथेंहि केली. सन १८६६ पर्यंत एक सुस्थिर पायावरचा धंदा सुरूंहि झाला होता आणि त्यासाठीं एक सिंकोना-खातेंच सुरूं करावें लागलें. आतां हा सिंकोनाचा धंदा फारच मोठ्या प्रमाणावर चालूं आहे.

"नीलगिरीप्रदेशांतील मुख्य बाजारी पीक म्हणजे बटाटे होय. या वनस्पति-उद्यानांत बटाट्याची लागवड सुरूं करून त्यावर सशास्त्र प्रयोग व संशोधन करण्याचें काम १९१७ पर्यंत चालूं होतें. त्यानंतरच तें एका निराळ्या खात्याकडे सरकारनें सोंपविलें.

"मुळांत ही बाग इंग्लिश भाजीपाल्यांसाठींच सुरूं केली होती. आज तेथें उत्पन्न होणाऱ्या भाजीपाल्याचा क्रमांक फार वरचा आहे. भाजी-पाल्याचें बीं-बियाणें मिळण्याचें हें एक मोठें केंद्र झालें आहे.

"डोंगरी फळांच्या बाबतींत तर या बागेचें महत्त्व अद्वितीय आहे. तेथें सफरचन्द, प्लम्, पीअर, पीच वगैरे फळांची लागवड होते. बाग सुरूं झाल्यावर लवकरच तेथें वाळवंटी फळें लागवडीला येऊं लागलीं आणि १८७१ मध्यें पहिलें मलबेरीचें झाड लावलें गेलें. त्यानंतर फळांची लागवड अनेक केंद्रांत होऊं लागली. आज तेथें वरील डोंगरी फळांप्रमाणेंच मॅङ्गोस्टीन, ड्यूरेन, ॲव्होकॅडो आणि ग्रेप-फ्रूट यांचीहि लागवड केली जाते व त्यांच्या एकंदर संग्रहाच्या आवांक्याकडे पाहतां कदाचित् जगांतील

'कोणत्याहि फलसंशोधनकेंद्राला ही बाग हार जाणार नाहीं ' असें तिचें वर्णन केलें जातें.

" नीलगिरि-यूकॅलिप्टस-झाडाची आपल्याकडे प्रथम लागवड करण्याचें श्रेय या बगीचाकडे जातें. आज तेथें या झाडाच्या ३६ जाती आहेत व त्यांपैकीं प्रत्येकांतून नीलगिरि तेल किंवा सिट्रिओडोरा तेल यांसारखें तेल निघतें. शिवाय या डोंगराळ प्रदेशांत या झाडांच्या लांकडांचा जळणासाठींहि मुख्यत्वें उपयोग होतो.

" खैरासारख्या ज्या वॅटल झाडांच्या सालींचा कातडें कमावण्याच्या धंद्याला अत्यंत उपयोग असतो, त्याचा पुरवठाहि येथून होतो आणि दक्षिण आफ्रिकेंतून याची आयात आतां बंद झाल्यामुळें तर याला फारच महत्त्व आलें आहे. नीलगिरींवरील २००० एकर क्षेत्रांत होणाऱ्या या वॅटल वृक्षांच्या लागवडीमुळें आपल्या देशाची गरज पुष्कळशी भागली जाते. या वॅटलविषयींचे प्राथमिक प्रयोग या उटकमंडच्या बागेमध्येंच झाले. या वृक्षांशिवाय देशी व परदेशी २० तऱ्हांच्या महत्त्वाच्या औषधी-वनस्पती येथें तयार होतात; इतर मुख्य तैलमय वनस्पती-जनावरांच्या खुराकांचीं पिकें व तंतु देणारीं पिकें-तसेंच रबर वगैरेहि येथें होतात. आणि यांवर कळस म्हणजे येथील असंख्य प्रकारच्या फुलांचे चमकदार रंगांचे ताटवे. कुंपणें, झुडपें, कुंज आणि राया यामुळें या बागेला 'जगांतील सार्वजनिक बागांतलि सर्वांत सुंदर बाग' अशी कीर्ति लाभली आहे.

" अनेक तऱ्हांच्या शोभेच्या व उपयुक्त अशा वनस्पतींची वाढ जलद कशी होईल यासाठीं उद्भिज्ज हार्मोन्सवर येथें प्रयोगाची परंपरा नुकतीच चालू झाली आहे. टमाट्याची बिनबियांची जात पैदा करण्यासाठीं हार्मोन्सच्या मदतीनें खटपट चालू आहे; तसेंच इतर अर्थोत्पादक ( economic ) वनस्पतींच्या वाढीवरही हार्मोन्सच्या मदतीनें काय परिणाम घडतात, याचें संशोधन येथें चालू आहे. फुलांच्या नव्या नव्या जाती उत्पन्न करण्यासाठीं कलम-पद्धति व संकर ( hybridisation ) यांचे प्रयोग चालू आहेत. त्याप्रमाणेंच आपल्या देशांतून व परदेशांतून येणाऱ्या वाढत्या मागणीला पुरेसा पुरवठा मिळावा म्हणून उपयुक्त वनस्पतींची अधिक प्रमाणांत वाढ करण्याचे प्रयत्नहि चालू आहेत.

" हिंदुस्थानांतील वनस्पतिशास्त्राच्या दृष्टीनें येथें चालणारें दक्षिण-हिंदुस्थानांतील फळाफुलांचें संशोधन फारच महत्त्वाचें आहे. आपल्या वनस्पतिशास्त्राच्या अध्यापकांना व विद्यार्थ्यांना तेथें असलेल्या शेकडों नैसर्गिक वृक्षजातींचें नेहमींच फार महत्त्व वाटत असतें.

" अशा या भूषणभूत बागेचें संरक्षण व संवर्धन करणें, हें सरकारचें व जनतेचें कर्तव्य आहे. "

### इन्का लोकांचें प्राचीन वसतिस्थान

दक्षिण अमेरिकेंत पश्चिमेकडील पेरू नांवाच्या देशांत ॲन्डीज पर्वताच्या आसऱ्यानें प्राचीन काळीं इन्का लोकांनीं साम्राज्यें स्थापन केली होतीं. लगतच्या वाळवंटाच्या विस्तारांतहि इन्कांच्या प्राचीन सुधारणेचे अवशेष सांपडतात. अमेरिका खंडाचा शोध लागल्यावर या पेरू देशांतील तत्कालीन राज्यकर्त्या इन्का लोकांच्या समृद्धीच्या कथा स्पॅनिश लोकांनीं ऐकल्या आणि दक्षिण अमेरिकेंत आपले पाय पसरले. इन्का लोकांचा या नवीन आक्रमकांविरुद्ध टिकाव लागला नाहीं. ( या इन्का संस्कृतीच्या पूर्वींहि येथें नास्का-Nasca-संस्कृति होती. ) या प्राचीन काळच्या लोकांच्या स्थापत्याचे कांहीं अजब अवशेष पुराणवस्तुसंशोधकांनीं उत्खनन करून बाहेर काढले आहेत. परंतु या इन्कांनीं आपली राजधानी कुस्को ( Cusco ) या शहरानजीकच्या बालेकिल्ल्याची जी तटबंदी बांधलेली आहे ती तर जगांतील एक महान् आश्चर्यच आहे. या प्राचीन अवशेषांची माहिती " दि नॅशनल जीऑग्राफिक मॅगेझिन "च्या ऑक्टोबर १९५० च्या अंकांत आणि " सायन्स डायजेस्ट "च्या मार्च, १९५० च्या अंकांत अनुक्रमें मि. किप् रॉस् व व्हिक्टर डब्ल्यू. फॉन् हेगन् यांच्या लेखांत आलेली आहे. ती पुढें सारांशानें संकलित करून दिली आहे :

मि. किप रॉस म्हणतात कीं, गेल्या सालीं मे महिन्याच्या २१ तारखेस पेरूमध्यें जो भयानक धरणीकंप झाला त्यांत या कुस्को शहराचा नाश झाल्याची वार्ता अमेरिकेच्या नॅशनल जिऑग्राफिक



अनुक्रमणिका






सोसायटीकडे आली. कुस्कोमध्यें स्पॅनिश लोकांनीं बांधलेले चर्चचे मनोरे, शहरांतील प्लाझासारख्या मध्यवर्ती इमारती सर्व कांहीं जुनें कोसळून नष्ट झालें. इन्का लोकांच्या अवशिष्ट भिंतींवर स्पॅनिश लोकांनीं या इमारती उभारल्या होत्या त्या जमीनदोस्त झाल्या. पण या इन्काकालीन भिंती जशाच्या तशाच राहिल्या !

स्पनिश आक्रमणापूर्वी ५०० वर्षे इन्का लोकांनीं ह्या कुरुंदी ( granite ) दगडाच्या इमारतींच्या भिंती उभारल्या. गाड्या किंवा पोलाद यांची माहिती नव्हती अशा त्या काळीं हे दगड कसे व कोठून आणले, कसे छिनले व आकारास आणले, हें कळणें कल्पनेच्या पलीकडचें आहे. हे दगड इतके कठीण आहेत कीं त्यांनीं कांचहि कापली जाईल. चुन्या-सिमिटावांचून ते घडवलेले दगड इतके बिनचूक सांधेजुळवणी करून बसविले आहेत कीं, त्या सांध्यांत चाकूचें पातेंहि घुसवतां येत नाहीं. १६ फूट उंचीवर ते कित्येक ठिकाणीं कसे चढवले हेंहि गूढच आहे.

या उंच पहाडी प्रदेशांतील आदिवासी इंडिअन्स् हे पेरुव्हियन लोकांहून भिन्न आहेत. त्यांच्या शरीर-रचनेंत नेहमींचे मंगुलाइड् विशेष आढळतात. पण ते उंचीला कमी असतात. आपल्याला विरळ हवेंत त्रास होतो पण हे लोक त्या हवेंत मजेंत असतात. त्यांची भाषा-क्वेचुआ ( Quechua )-ही पूर्वीं संबंध ॲन्डीज्च्या पहाडी प्रदेशांत अस्तित्वांत असलेल्या एका मृत भाषेची अवशिष्ट उपभाषा आहे. Runa म्हणजे माणूस, huarmi = स्त्री, rucana = हाताचें बोट, cocha = सरोवर, yana = काळा. कांहीं शब्दांचा ध्वनि अर्थानुसारी होता; cullcu = कबूतर, आणि huahua ( wawa ) म्हणजे 'क्यांहां' करणारें मूल. १३,००० फूट उंचीच्या प्रदेशांतहि बार्ली, मका आणि पिगुवीड यांची पिकें निघतात व त्यासाठीं बर्फाच्छादित शिखरांवरून वाहणाऱ्या थंड झऱ्यांच्या पाण्याचा उपयोग केला जातो.

कुस्को शहर ११,१५५ फुट उंचीवर आहे. वस्ती सुमारें ५३,००० असून बहुतेक मूळ इंडिअन् वंशांतीलच लोक तेथें आहेत. लामा नांवाचे प्राणी येथें पाळले जातात. इन्का लोकांच्या भाषेंत कुस्को म्हणजे 'Navel of the world' 'विश्वाचें नाभिचक्र' होय. या शहराचें आधुनिक स्वरूप डॉ. गिसेक ( Giesecke ) यांनीं निर्माण केलें. ते मूळचे युनायटेड् स्टेट्स्चे नागरिक असूनहि अनेक वर्षें या जमातींत राहिले. १२ वर्षें ते कुस्को युनिव्हर्सिटीचे मुख्य होते व तीन वर्षें त्या शहराचे मेयर होते.

इन्का लोकांच्या या राजधानीइतकेंच महत्त्वाचें दुसरें स्थान माच्यु पिक्चु ( Machu Picchu ) नांवाचें ठिकाण होय. ही आकाशाच्या कुशींत असलेली नगरी मूळ केव्हां निर्माण झाली, हें अजून गूढ आहे. हा इन्का लोकांचा बालेकिल्ला १९१२ सालीं प्रा. हिराम् बिंघाम् यांनीं शोधून काढला. इन्का लोकांच्या काळीं जसें होतें तसेंच आजहि उपलब्ध असलेलें हेंच सर्वांत मोठें व पूर्ण शहर आहे. म्हणून याचें विशेष महत्त्व. १६व्या शतकांत येथील शेवटचे रहिवासी नष्ट झाल्यावर त्यावर जंगल माजलें. स्पॅनिश वसाहतवाल्यांच्याहि नजरेस तें पडलें नाहीं इतकें तें उंच व अदृश्य राहिलें. हें शहर प्रत्यक्ष जरा खोलगट जागींच असून त्याची उंची ८००० फूट आहे. परंतु या ठिकाणीं पोंचण्याचे रस्ते याहून फारच उंचीचे आहेत. एका बाजूला Machu Picchu नांवाचेंच उंच पर्वतशिखर आहे व दुसऱ्या बाजूलाहि अत्यंत उंच असें दुसरें एक शिखर आहे. याच ठिकाणीं शेवटचे चार स्वतंत्र इन्का सम्राट् राहिले. Vilcapampa 'व्हिल्कापाम्पा' हें या शहराचें मूळचें इन्काकालीन नांव. 'मंदिरमय शहर' —माच्यु पिक्च्यु—हें नांव प्रो. बिंघाम् यांनीं १९११ मध्यें याला दिलें. इन्का मॅन्को या राजानें कुस्को शहर पडल्यावर येथें पलायन केलें. पण हा राजा अखेरीस स्पॅनिअर्ड लोकांच्या हातीं गवसला व त्यांनीं त्याची कुस्कोपर्यंत धिंड काढून १५७२ सालीं त्याला ठार मारला. हे स्पॅनिश लोक फक्त इन्काच्या 'व्हिटकोस्' ( Vitcos ) पर्यंत म्हणजे लष्करी छावणीपर्यंत पोंचले. ते पुढें मुख्य 'व्हिल्कापाम्पा' पर्यंत आलेच नाहींत. स्पॅनिश व देशी इन्डियन दोघेहि हें शहर विसरून गेले व तेथें जंगल वाढलें.

१९११ सालीं उत्खनन करीत असतां हें शहर —म्हणजे 'भिंतीवर आधारलेल्या १०० गच्च्या'—

बिंघामच्या नजरेस पडलें. या शहरांतील रस्ते पायऱ्या-पायऱ्यांचे आहेत. असे रस्ते किंवा जिने १०० वर आहेत. अनेक देवळें आहेत. स्मशानाच्या गुहांतून १७३ मृतशरीरें मिळालीं. यांत १:१० या प्रमाणांत स्त्रिया होत्या. शहराभोंवतीं तटबंदीच्या भिंती आहेत, त्या हातांनीं उभारलेल्या आहेत, नैसर्गिक नाहींत. बाजूला दोन पर्वतशिखरें आहेत. त्यांवर टेहेळणीचे बुरूज होते. एकंदर शहर नैसर्गिक रीत्याच सुरक्षित आहे. थोड्याशा माणसांकरवीं त्याचें रक्षण करणें शक्य होतें.

या प्रदेशांत येतांना विमानांतून एक विलक्षण दृश्य दिसलें. खालीं दऱ्याखोरीं होतीं व नद्या वांकड्यातिकड्या वाहात होत्या. पण यांना विरोधी अशा सरळ रेषा विमानांतून दिसूं लागल्या. कांहीं समांतर, कांहीं परस्परछेद करणाऱ्या, काहीं पंख्या-सारख्या रुंदावत गेलेल्या अशा किती तरी रेषा ! त्या बहुतेक पूर्व-पश्चिम दिशेनें पसरलेल्या दिसल्या. त्या माणसांनीं खोदलेल्या होत्या, हें दिसलें. पण तेथें वसतीचीं चिन्हें दिसेनात. या गूढ रेषांचा खुलासा असा आहे कीं, या प्रदेशांत पूर्वी ( इन्कापूर्व कालीं ) नास्का लोकांची संस्कृति होती. त्या प्राचीन काळच्या ज्योतिर्विद् लोकांनीं बहुधा सूर्य, चंद्र, तारे व ग्रह यांचें निरीक्षण करावयास साहाय्यभूत व्हावें म्हणून हें सरळ रेषांचें खोदकाम केलें असावें. खरोखर हें त्या काळच्या खेडवळांचें पंचांगच होतें. पण केवढ्या मोठ्या प्रमाणावरचें !

मि. व्हिक्टर डब्ल्यू. फॉन हेगन यांच्या लेखांत कुस्को शहराच्या उत्तरेस उंचावरून खालीं पाहात असलेल्या Sacsahuaman साक्साव्हामनच्या बालेकिल्ल्याचें वर्णन आहे. प्राचीन इन्कांची ही 'Maginot line' होय, असें ते वर्णन करतात. आपल्या कोंडाण्याच्यासारखीच या किल्ल्याची कथा आहे.

हा किल्ला म्हणजे प्राचीन लोकांनीं स्थापत्य-रचनेनें निर्माण केलेलें मूर्तिमंत आश्चर्य होय. तो एक चमत्कारच वाटतो. या तटबंदीची लांबी १८०० फुटांवर आहे. त्यांत मधेंमधें बोगदे खोदून जणूं मोहोळ बनाविलें आहे. या किल्ल्यावरून कुस्को राज-धानीचें संरक्षण केलें जाई. यांतील प्रचंड आकाराचे दगड व त्यांचे खुबीदार सांधे, नागमोडी रचनेची तटबंदी—ज्यावरून रक्षणकर्त्यांना मारा करतां यावा-किल्ल्याच्या एका टोंकापासून दुसऱ्या टोंकापर्यंत जातां येण्यासाठीं खोदलेले भुयारी मार्ग आणि टेहळणीसाठीं व खुणांसाठीं बांधलेले राक्षसी मनोऱ्यांचे बुरूज—सर्व कांहीं विस्मयचकित करून टाकणारें आहे.

११०व्या शतकांत पहिला इन्का सम्राट् मान्को कापाक् यानें ॲन्डीजचा हा प्रदेश व्यापला व कुस्को शहर स्थापलें अशी दंतकथा आहे. त्या वेळीं ॲन्डी-यन प्रदेशांत निरनिराळ्या जमाती रहात होत्या. पण त्यांचें शेतकीविषयक तंत्र समानच होतें. या मान्को कापाकनें ह्या दरींतील जमिनीचा सुपीकपणा हेरला आणि नैसर्गिक संरक्षणक्षमता पाहिली. तेथेंच त्यानें आपला सोन्याचा राजदंड जमिनींत खुपसला आणि कुस्को शहराची जागा दाखविली.

१५ व्या शतकांत इन्का पचाक्यूटी ( 'भूकंपक'-Earth-Shaker ) यानें वरील बालेकिल्ल्याची कल्पना लढविली. तेथून खरोखर कुस्कोचें रक्षण करतां येणार नव्हतें. पण सगळीकडून एकाएकीं हल्ला आल्यास शहरांतील सर्व लोकांना तेथें आसऱ्याला येतां आलें असतें. याप्रमाणें उत्तरेच्या बाजूला १८०० फुटांची प्रचंड भिंत त्यानें उभारली. तिच्या तीन भरगच्च रांगा होत्या व ती ४६ भागांत विभागली होती. प्रत्येक विभागावर एक गच्ची व बुरुजाच्या भिंती आहेत. सर्व मिळून उंची ६० फूट भरेल. ही सर्व भिंत भरीव नव्हती. पण पुढें आलेले बुरूज, आंत गेलेले कोन वगैरे इतकीं मजबूत झालीं होतीं कीं, इन्डियन जमातींतील इन्कांच्या शत्रूंनीं यावर कधीं सरळ हल्ला चढविला नाहीं. पण स्पॅनिश लोकांनीं याच्यां-तील दोन मुख्य लष्करी बुरूजांचा नाश केला आहे. किल्ल्याच्या मध्यभागीं एका त्रिकोणांत वाटोळा मनोरा होता. हा पाण्याचा सांठा होय. यांत सुमारें ५०,००० गॅलन पाणी रहातें. यांतून किल्ल्याच्या सर्व दिशांना पाटबंधाऱ्यांनीं पाणी नेलेलें आहे. इतक्या उंचीवर सांठ्याच्या बुरुजावर पाणी कसें आणीत असतील, तें अजून अज्ञातच आहे. कल्पना अशी आहे कीं, जमिनीखालून ( राजापुरी गंगेच्या










सारखें ) सायफनच्या तत्त्वानें हें पाणी जवळच्या उंच ठिकाणाहून आणलेलें असावें.

हा किल्ला बांधावयाला ७० वर्षें लागलीं आणि २०,००० इन्डियन मजूर सारखे खपत होते, असें जुने बखरकार म्हणतात. पण एवढे अजस्त्र दगड या इन्डियन लोकांनीं फोडले कसे, घडवले कसे व वाहून नेले कसे? यांतील सर्वांत मोठ्या एकसंधी दगडाची उंची २७ फूट, रुंदी १४ फूट व जाडी १२ फूट असून वजन २०० टनांहून अधिक असावें. असले दगड तेथें कसें आणले असतील?

स्पॅनिश आक्रमणापूर्वी इन्डियनांजवळ घोडे किंवा बैल नव्हते; फक्त लामा नांवाचे माणसाळलेले प्राणी होते. ते जास्तींत जास्त ७५ पौंड वजन वाहात. या लोकांचें मुख्य हत्यार दगडी छिनी हें होतें. खडकांत लांकडी पाचरी घालून त्या पाण्यानें फुगवल्या म्हणजे खडक फुटत. मग कामाला येणारे दगड दगडी छिनीनें किंवा पंचरसी धातूच्या खडबडीत हत्यारानें ते घडवीत. हे दगड माणसांकरवीं ओढले जात; लाकडांवरून आणि दगडी रुळांवरून दोरखंडाच्या साह्यानें सरकवले जात; मातीच्या उंच राशीवर चढवून ते योग्य जागीं ढकलले जात.

१५३३ सालीं स्पॅनिश विजेता पिझारो यानें इन्का ' आताव्हाल्पा ' याला पकडलें आणि किल्ला न लढवतांच इन्का साम्राज्याचा अंत झाला. पण पुढें तीन वर्षांनीं इंडियन जनतेनें सर्वंध पेरूमध्येंच बंडाची उठावणी केली. कुस्कोंतील स्पॅनिश लोकांना वेढा पडला आणि हा बालेकिल्लाहि बंडखोरांच्या हातीं आला. निकराची चढाई करावयाचें ठरवून ९० स्पॅनिअर्ड लोकांनीं राजनिष्ठ इन्डियनांच्या साह्यानें तीन तुकड्यांनीं या बालेकिल्ल्यावर हल्ला चढविला. इन्डियनांनीं किल्ला लढवण्याची शर्थ केली; खाली दगडांचा व बाणादिकांचा वर्षाव केला. त्यांत स्पॅनिश सेनापति ठार झाला. असा एकेक भाग लढवून मगच तो सोडला गेला. मध्यवर्ती बुरूज मात्र अखेरपर्यन्त लढवला. त्यांत इन्कांचा सेनापति बंडखोरांचा पुढारी होता. पण खूप शर्तीनें लढा देऊनहि त्यांचा टिकाव लागला नाहीं. स्पॅनिश लोक चोहोंकडून शिड्या लावून तटावर चढले व आंत शिरले. मोजके सैनिक लढत होते. पण त्या इन्का राजानें जेव्हां पाहिलें कीं, आपला निभाव लागत नाहीं, तेव्हां तो तटाच्या भिंतीवर उडी मारून उभा राहिला; आपली गदा दूर फेंकून त्यानें आपला शेला सभोंवतीं गुंडाळला आणि वरून खालीं उडी घेतली. इन्कांच्या या कोंडाण्याच्या लढाईचा असा शेवट झाला.

## बाल-गुन्हेगारांचें मनोदर्शन

हिंदुस्थानांत अनेक तऱ्हांच्या गुन्हेगारांबरोबरच बाल-गुन्हेगारांची संख्याहि खूपच आहे. गुन्हेगारांच्या मानसिक-सामाजिक स्थितीचा अभ्यास करून गुन्ह्यांचीं कारणेंच नाहींशीं करण्यासाठीं झटणें, हें कोणत्याहि सुधारलेल्या राष्ट्राचें व सरकारचें कर्तव्यच आहे. आपल्याकडे जनतेंतील ऐतखाऊपणाची संवय आणि दारिद्य यांमुळें गुन्ह्यांचें प्रमाण व प्रकार अपरिमित झाले आहेत. भिकारी, गांवगुंड, भटक्ये, मवाली यांचा प्रसार फार असल्यामुळें बालकांना गुन्ह्यांचें शिक्षण जाणूनबुजून व नेणतांहि सारखें मिळत राहतें. एका बालगुन्हेगाराचें चित्र कवि यशवंतांनीं ' बंदिशाळा ' या खंडकाव्यांत रेखाटलें आहे. पण आपणाला हवी आहे बालगुन्हेगाराच्या मनाची चिकित्सा. अमेरिकेंत तसे प्रयत्न वारंवार होतात. सर्वसामान्यपणें सुखवस्तु असणाऱ्या अमेरिकन समाजांत आपल्याकडील दारिद्य व तज्जन्य गुन्हेगारीचीं कारणें खास अशीं नाहींत. परंतु तरीहि गुन्हे होतात व त्यांतहि बालगुन्हेगारांची संख्या फार असते. यासंबंधीं दहा वर्षें संशोधन करून प्रो. शेल्डन ग्लुएक व त्यांच्या पत्नी डॉ. एलिनॉर ग्लुएक यांनीं एक रिपोर्ट लिहिला आहे. त्यांत या बाल-गुन्हेगारांच्या मनोविकृतीची किंवा मनोवृत्तीची चिकित्सा करून मौलिक प्रकारचीं वैयक्तिक व सामाजिक कारणें शोधून काढलीं आहेत. " रीडर्स डायजेस्ट " च्या नोव्हेंबर १९५० च्या अंकांत यासंबंधीं आलेल्या लेखावरून पुढील उद्बोधक माहिती संकलित केली आहे :

अमेरिकेंत १०० मुलांत १ मुलगा पोलिसांपुढें एक बिकट प्रश्न उभा करतो. २,८०,००० मुलें दरवर्षीं कोर्टापुढें उभीं केलीं जातात. त्याच्या निदान दुप्पट मुलें तरी अनधिकृत रीत्या सामाजिक किंवा चर्चनियंत्रित संस्थांकडून तपासलीं जातात.








आणि किती मुलें हातावर तुरी देऊन गुन्हे लपवितात तें सांगतां येत नाहीं.

भलत्या जागीं व गैर कुटुंबांत वाढलेल्या मुलांपैकींहि बहुसंख्य मुलें चांगलीं निघतात. हीं बहुसंख्य मुलें चांगलीं निघणें व अल्पसंख्य वाईट निघणें यांत कोणता मौलिक भेद आहे? बालगुन्हेगारांच्या बाबतींत सर्वसामान्यतः लागू पडतील अशीं कारणें शोधणें, हा ग्लुएकदंपतीच्या या तपासणीचा हेतु होता.

या दांपत्यानें काळजीपूर्वक निवडलेल्या १००० लहान वयाच्या मुलांचीं १० वर्षें तपासणी केली. त्यांपैकीं ५०० मुलें घरीं व शाळेंत व्यवस्थित वागणारीं—'नॉर्मल' होतीं. राहिलेलीं ५०० मुलें न्यायाधीश, डॉक्टर, सामाजिक-आर्थिक संस्था आणि चर्चचे कार्यकर्ते यांनाहि न बधलेलीं, पोलिसांच्या पुढें उभीं केलेलीं, अशीं होतीं. या मुलांच्या सामाजिक आर्थिक परिस्थितीच्या मानानें समान अशा जोड्या-जोड्या केलेल्या होत्या. समान सामाजिक-आर्थिक स्थितीचा सद्वर्तनी मुलगा तशाच स्थितींतील दुर्वर्तनी मुलांबरोबर ठेवला. अशा तऱ्हेनें कष्टपूर्वक माहिती गोळा करतां करतां त्यांतून जो प्राणी बाहेर आला तो म्हणजे संमिश्र स्वरूपाचा (composite) बालगुन्हेगार!

हा सरासरी बालगुन्हेगार शरीरानें निरोगी व ताकदवान् असतो. शरीररचनेंत किंवा आरोग्यांत तो इतर मुलांसारखाच असतो. दुसरी गंमत अशी आहे कीं, सद्वर्तनी व गुन्हेगार मुलांची मनःशरीरदृष्ट्या तपासणी करतां गुन्हेगारांपेक्षां चांगल्या मुलांतच 'न्यूरॉलॉजिकल' किंवा 'सायकोन्यूरॉटिक'—मानसशारीरविकृती जास्त प्रमाणांत आढळल्या!

खरा फरक आढळतो मनोवृत्तीचा अभ्यास करतांना. अगदीं लहानपणापासूनच गुन्हेगारवृत्तीच्या मुलाला आपल्या सभोंवतालच्या समाजाप्रमाणें रीतभात ठेवणें किंवा विचार करणें कठीण जातें; थोडक्यांत म्हणजे त्याला 'व्यावहारिक शहाणपणा' (common sense) कमी असतो. आपल्या इच्छेप्रमाणें वागण्याकडे त्याची प्रवृत्ति असते. एखादी गोष्ट पाहिजे म्हणजे पाहिजे. त्याला नमून वागणें नको असतें. जणूं कांहीं उपजत प्रेरणेनेंच तो सर्व नियमांना गुंडाळून ठेवूं पाहतो. हें महत्त्वाचें चिन्ह आहे.

त्याला हीनगंडहि नसतो किंवा चिंताभारहि नसतो. त्याला स्वतःबद्दल खात्री असते. बरोबरीचा सद्वर्तनी मुलगा इतरांकडे आश्रयासाठीं पाहील; पण हा मुलगा इतरांची पर्वा करणार नाहीं. मुळांतूनच त्याला इतरांच्या अपेक्षेप्रमाणें वागणें जरूरीचें वाटत नाहीं; मूलतःच त्याला सहकार्य करणें पसंत नसतें.

तो नेहमीं प्रमाद करीत असतो. भावनावशतेनें तो वागतो; त्याचा स्वतःवर ताबा कमी असतो. तरी पण त्याच्या या बेछूट वागण्यांतहि एक प्रकारची उमदेपणाची झांक असते व ती इतर नम्र सद्वर्तनी नागरिकांनाहि झांकून टाकते. मानसशास्त्रज्ञ अशा वृत्तीच्या माणसाला बहिर्मुखवृत्तीचा (extrovert) म्हणतात. आपल्या मनावरील ताण तो भावनावश कृत्यें करून दूर करूं पाहतो. तो विचार करीत स्वस्थ बसत नाहीं. त्याची कृति स्फोटकासारखी असते. मनोविकृति-चिकित्सेची (psychiatric) कसोटी लावून पाहतां त्यांत आढळून येणारा फार अर्थपूर्ण विशेष म्हणजे त्याची साहसाची दुर्दम्य आवड. संकटांत उडी घेणें ही त्याला अनिवार्य गोष्ट असते. ती त्याची अतृप्त वांछना असते. जुन्या अंदाधुंदीच्या काळांत अनेक मार्गांनीं ही वृत्ति तृप्त होऊं शके. पण आतां तसें शक्य होत नाहीं. त्यामुळें त्यांतून पुढें चांगले नागरिक निर्माण व्हावयाचे ते होत नाहींत. आजच्या मुलांना अनेक वेळां असेंच वाटतें कीं, रोमहर्षणकारक गोष्टी करावयाच्या तर आपण कायदेकानूंचा भंग केलाच पाहिजे. या तपासणींत नजरेला आलेली अत्यंत विस्मयकारक गोष्ट हीच आहे. अशा प्रवृत्तीच्या मुलांना साहसी कृत्यें आणि रोमहर्षणकारक गंमतीचे प्रकार अधिक पसंत असतात. या वृत्तीची तृप्ति करण्यासाठीं तीं मुलें चोरून मोटारींत बसून जातात, लॉऱ्यांतून चढतात. रस्त्यावर रात्रीं उशीरापर्यंत भटकत राहतात; हानिकारक गंमत करण्यांत त्यांना आनंद वाटतो आणि विशीच्या आंतच तीं दारू पिऊं लागतात. नद्यांतलावांचे किनारे, रेल्वेचीं आवारें, हलकीं नाचगृहें, आणि गंमतीजंमतीचे





अनुक्रमणिका






बगीचे हे या पोरांच्या कंपूंचे आखाडे असतात. ५०० पैकीं निम्मे मुलगे अशा टोळ्यांत प्रत्यक्ष भाग घेणारे होते. या टोळ्या समाजविरोधी कामें करण्याच्या निश्चित हेतूनें आणि प्रभावी नेतृत्वाखालीं संघटित झालेल्या असतात.

कोणाहि मुलाच्या जीवनांतील अत्यंत अर्थपूर्ण गोष्ट म्हणजे त्याचा आपल्या आईबापाशीं, विशेषतः बापाशीं, असणारा संबंध. हें नातें बिघडलें तर मुलाची वाढ चांगली न होण्याची भीति असते. मुलाला बापाबरोबरच्या 'भावनात्मक तादात्म्या'-(emotional identification)-ची फार गरज असते; त्याला आपल्यापुढें एक आदर्श प्रतिमा हवी असते. वडीलधारा, वृद्ध, शहाणा सोबती हवा असतो. त्याला जर या गरजेची तृप्ति करून घेतां आली नाहीं—बाप जर तुसडा, तिरसट आणि शत्रुत्व दाखविणारा असला—तर तो अशा प्रबळ, धीट, भक्कम सोबतीसाठीं आजूबाजूच्या संवगड्यांकडे पाहील व त्याला तेथें तसा एखादा गुंड लाभेलहि. त्या तपासणींत असें दिसलें कीं, सामान्यतः ह्या बालगुन्हेगारांचें बापाशीं बराच काळ बिनसलेलें असतें, उलट सद्वर्तनी मुलें आपल्या बापाशीं अगदीं आपुलकीनें वागणारीं असतात.

६ वर्षांच्या मुलांत ह्या सर्वच गोष्टी आढळतात असें नाहीं; पण कांहीं आढळतात व त्या दिसणें म्हणजे अशुभाचेंच लक्षण आहे. या तपासणीसाठीं पुढील गोष्टी लक्षांत घेतात : मुलगा दृष्टोत्पत्तीस येण्याइतका साहसप्रिय, बहिर्मुख, हट्टी, भावनावशपणें आपलेंच खरें करणारा, आपल्या आक्रमक इच्छेचा प्रभाव इतरांवर गाजवूं इच्छिणारा, आज्ञाभंग करणारा, संशयी, मोडतोड करणारा, असा होता का? याशिवाय बापाची शिस्त ढिली, अव्यवस्थित, जादा कडक, चिडखोरीची होती कीं स्थिर आणि कनवाळूपणाची होती?—ह्याहि गोष्टी लक्षांत घेणें महत्त्वाचें असतें. कारण अव्यवस्थित ढिल्या शिस्तीच्या मुलांत शेंकडा ५९·८ इतकीं मुलें गुन्हेगार वृत्तीखालीं आलीं आणि व्यवस्थित, कनवाळू, शिस्तींत वाढलेल्या मुलांपैकीं शेंकडा ९·३ एवढींच अशा वृत्तीचीं आढळलीं.

सहा वर्षें वयाला जर गुन्हेगार प्रवृत्तीचीं मुलें निराळीं ठेवून तीं ममतेच्या व आस्थेच्या वातावरणांत वाढविलीं गेलीं तर त्यांपैकीं शेंकडा ६५ ते ७० पर्यंत मुलें सुधारण्याची शक्यता असते. पण त्यासाठीं एकंदरींत घरचें प्रसन्न वातावरण, विशेषतः बापाची उत्तम वागणूक, शाळेंतील शिक्षणपद्धतींत मुलांच्या संपूर्ण व्यक्तिविकासाला वाव, त्याच्या प्रमाणाधिक जादा कार्यशक्ती–(Energy) ला योग्य वाट करून देणें, अशा मुलांना ज्यूनिअर पोलिसांसारखें शिक्षण देऊन त्यांच्याकडून कायदा पाळणें भाग पाडण्याचें काम करून घेणाऱ्या संस्था—पण सर्वांत अधिक म्हणजे सुव्यस्थित घरें व समजूतदार कुटुंब हीं अवश्य पाहिजेत.

ग्लुएक दंपती पुढें म्हणतात: "आपण हिंसेच्या युगांत रहात आहोंत. भ्रष्ट राजकारणामुळें नीतिनियमांचें हंसें होत आहे. जोंवर मोठमोठ्या प्रमाणावरील गुन्हे करणारे प्रमुख गुन्हेगार कोर्टापुढें यावयाचें टाळूं शकतात व राजकारणी माणसें भ्रष्टतेनें बरबटलेलीं आहेत, तोंवर तरुण मुलांतील गुन्ह्याची प्रवृत्ति गर्ह्य म्हणणें शक्य नाहीं. मुलांपुढें सुसंगत, नैतिक दृष्ट्या उच्च अशीं मूल्येंच नाहींत. म्हणूनच सर्व उपदेश फुकट जातो. त्यांना आपण मोठीं माणसेंहि कशीं आहोंत तें माहीत असतें."

## सरदार वल्लभभाई पटेल : पुण्यस्मरण [पान ५९ वरून पुढें चालू]

ईश्वराची इच्छा तशी नव्हती. त्यांचें अन्त्यदर्शनहि मला होऊं शकलें नाहीं! त्यांचा वज्रदेह कराल ज्वालांनीं ग्रासलेला मात्र पाहिला!!

लाखों मैलांच्या ज्वाळा आपल्या आसपास फेंकणारा व पृथ्वीसारख्या अनेक गोलांना वितळून काढण्याची शक्ति धारण करणारा भगवान् सूर्य अपार अंतरावरून पृथ्वीवरील नाजूक कळीला फुलवितो आणि चंद्रांत आपलें तेज समाविष्ट करून त्याच्या मृदु करांनीं कुमुदांना रात्रीं हंसवितो!

भयंकर वाटणाऱ्या वस्तू देखील वारंवार जगांत शुभंकर सिद्ध होतात; तापदायक दिसणाऱ्या परिणामीं सौम्य ठरतात!

वस्तूचा वियोग झाल्यानंतरच तिची योग्यता ध्यानांत येते. सरदार वल्लभभाईंचें अवतारकृत्य त्यांच्या पश्चात् राष्ट्राला पूर्णत्वानें समजेल.

Regd. No. B. 5177



अनुक्रमणिका






